# फोटोंचं लग्न

## नि इतर लघुकथा

लेखक

विठ्ठल कृष्ण नेरूरकर, बी. ए.




* १६ *

मूल्य दीड रुपया

माझ्या लघुकथांचा पहिला संग्रह " प्रतिबिंबें " या नांवानें कांहीं वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला. त्याचें मार्मिक रसिकांनीं चांगलें स्वागत केलें. अनेक नियतकालिकांच्या संपादकांनीं त्यांतील कथांवर आपले बहुमूल्य विचार प्रगट केले आणि मला उपकृत केलें. त्याबद्दल माझ्या मनांत कृतज्ञता वसत आहे.

' फोटोंचं लग्न नि इतर लघुकथा ' हा दुसरा कथासंग्रह आज प्रसिद्ध होण्याचा सुयोग येत आहे. माझी ही वाङ्मयसेवा रसिक वाचकांस आवडेल अशी अपेक्षा आहे.

वि. कृ. नेरूरकर

मुंबई, रामनवमी, शक १८६६

## फोटोंचं लग्न

ती पुस्तकवाचनांत गढून गेलेली दिसत होती. तो नुकताच येऊन पोंचला होता. त्यानें दरवाजांत पदार्पण केलें, तेथें त्याला कोणीच दिसलें नाहीं. पण घराचें दार उघडेंच होतें.

हलक्या पावलांनीं तो एका विशिष्ट खोलीकडे वळला. खोलीचें दारहि उघडेंच होतें आणि ती पुस्तकवाचनांत गढलेली दिसत होती. तिला थोडीशी चाहूल लागताच तिनें पुस्तक मिटलें आणि मागें पाहिलें, तों तिला त्याची मुद्रा संशयाविष्ट झालेली दिसली. तिच्या पुस्तकाकडे त्याची नजर लागलेली होती.

तो कांहीं न बोलतांच आत आला व तें पुस्तक उचलणार, तोंच तिनें तें पुस्तक झटकन् पकडलें. त्याचा संशय दुणावला म्हणा, किंवा तें पुस्तक उघडून पाहाण्याची इच्छा बलवत्तर झाली म्हणा; पण एक अक्षरहि न बोलतां त्यानें करारी मुद्रा धारण करून पुस्तकासाठीं हात पुढें केला. तो हात पुस्तक मागण्यासाठीं पुढें केला होता व मागणी हुकमी होती हें त्याच्या दृष्टीवरून व मुद्रेवरून स्पष्ट होत होतें.

"बसा तर खरे आधीं या खुर्चीवर." ती म्हणाली.

"अंहं !" त्यानें न बसतां आपला हात अधिकच पुढें नेला.

"प्रत्येक खेपेला आपण मलाच पड घ्यायला लावतां; हा पुरुषी वरचढपणा एव्हांपासूनच दिसायला लागला. लग्न झाल्यावर तर मग काय होईल कुणास ठाऊक; पण आतां लग्नाचं तरी कसं काय जमतं..."

असें अर्धवट स्वतःशींच बोलल्याप्रमाणें करीत तिनें पुस्तक पदराखालीं धरलें आणि त्यांतून कांहींतरी काढून घेऊन, नंतर तें त्याच्याकडे दिलें. त्यानें तें पुस्तक घेऊन बाजूला ठेवलें आणि पुन्हा हात पुढें केलाच.

"छान ! मीं आपली एक मागणी पुरवली. आतां आपण आधीं या खुर्चीवर बसायचं..."

" हं, अस्सं ! " त्याला खुर्चीवर बसत असलेला पाहून तीच म्हणाली. याची मुद्रा अधिकच संशयी व हेकेखोर दिसत होती. पण तिनें त्याच्या हातावर त्याला पाहिजे असलेली वस्तु न ठेवतां व त्याच्या मुद्रेकडे लक्षहि न देतां त्या पदराखालील वस्तूकडे व त्याच्याकडे ती आळीपाळीनें पाहात राहिली. जणूं काय तिला त्याच्या मुद्रेवरील कोपाविर्भाव दिसला नव्हता.

त्याच्या जागीं दुसरा कोणी पुरुष असता तर त्यानें तिच्यावर क्षणार्धात हल्ला करून आपल्या पीळदार व कसलेल्या बाहुदंडांनीं शासन केलें असतें व ती वस्तु काढून घेतली असती. परंतु या ठिकाणीं लटका राग दाखविण्या-पलीकडे त्याला कोणतेंहि शासन करतां येण्यासारखें नव्हतें.

परंतु तो थोडासा चिडखोर होता. तिनें ती पदराखालीं लपविलेली वस्तु शेवटीं त्याच्याजवळ दिली. तो तत्क्षणींच चकित झाला होता, पण आपल्या अंतरंगांतील हालचाल आपल्या चेहऱ्यावर दिसूं नये म्हणून त्याच्या चाललेल्या प्रयत्नांस यश मिळत नव्हतें. त्याची ही मनस्थिति तिनें ओळखली.

" कुणाचा फोटो हा ? " त्याच्या या शब्दांत असूया भरली होती.

" आपणांला बोलायला येतं तर ! दहा दिवसांपूर्वी आपण निघून गेला आणि आतां येतांना म्हटलं, आपण एखादी शक्ति संपादून आणि वाक्शक्ति गमावून आलांत कीं काय ? " ती मिस्कीलपणानें सारखी बोलत राहिली होती.

" वृंदे ! जरा थांबशील का ? प्रथम मला हा फोटो कोणाचा आणि तुझ्याकडे कसा आला तें सांग ना ! " तो आपल्या हृदयांत शांतपणा प्रस्थापित करण्याचा आव आणून म्हणाला.

" कां बरं ? आपल्याला आवडला का हा फोटो ? आपल्या संग्रहीं ठेवायला पाहिजे असल्यास मी तो आपणांस द्यावयास तयार आहें."

" आणि तो देणाऱ्यानें पुनः मागितला तर ? " अंतरंगाचा ठाव काढण्याच्या हेतूनें त्यानें खडा टाकला.

" पण तुम्हांला कसा दिसतो हा फोटो ? " तिनें जीभ चावून खिजविण्यासाठीं मुद्दाम विचारलें.

" छान आहे ! " तो म्हणाला. आणि तो फोटो ज्या पुरुषाचा असेल तो पुरुष सुंदर, रंगेल आणि छानछोकी असला पाहिजे असें स्पष्ट दिसत होतें.

"थोडं लिंबाचं सरबत आणूं का?" वृंदेनें विचारलें, "उष्मा फार होतोय्."

"कांहीं नको. हा फोटो कुणाचा तें तूं अजून नाहीं सांगितलंस वृंदे!"

"सांगतें ना! थोडा धीर धरायला कधीं शिकणार? पण मी त्या फोटोची हकीगत सांगितल्यावर तुमचं चित्त ठिकाणावर राहील ना?"

"म्हणजे? माझं चित्त ठिकाणावर न राहाण्यासारखी त्या फोटोची हकीगत तरी काय आहे?"

"आहे; तशीच चमत्कारिक ती हकीगत आहे. या गृहस्थांनीं मला मागणी घातली आहे. त्यांनीं हा आपला फोटो माझ्याकडे पाठवून दिला आहे. माझा फोटो त्यांनीं पूर्वीच पाहिला होता..."

"कधीं पाठविलास तो तूं..."

"माझ्या मावशीकडे माझा एक फोटो होता ना? तो त्यांच्या पाहाण्यांत आला होता; आणि मावशीच्या मध्यस्थीनेंच ही मागणी आलेली आहे. मी पाठविला नाहीं बरं जाहिरात देऊन!" शेवटचें वाक्य त्याला चिडविण्यासाठींच फेंकलेलें होतें.

"कसं का असेना? फोटोंची अदलाबदल तर झालीच. आतां याच्या पुढची पायरी कोणती बरं?" त्यानें विचारलें.

"याच्या पुढची पायरी म्हणजे मला सांगली हुबळीवरून एकवार जाऊन यायचं आहे. मी मॅट्रिक होईपर्यंत खर्च मामांनींच चालवला आहे. आणि हें स्थळ बरंच श्रीमंत असल्यामुळें मी त्या गोष्टीला संमती द्यावी असं टुमणं मामांनीं मावशीच्या व आईच्या मार्फत सारखं लावलं आहे."

"म्हणजे? तुमच्या आईचं मत इतकं लवचीक आहे का?"

"मला नाहीं समजलं आपलं बोलणं. आणि इतक्यांत 'तुझ्या'चं 'तुमच्या' झालं का?" हसत वृंदा म्हणाली.

"कां बरं? आपले दोघांचे हेतु, विचार, आशा आणि स्नेहसंघटन तुमच्या आईस ठाऊक नाहीं का? आणि ठाऊक असल्यास तिनं इथवर गोष्टी येण्यास उत्तेजन कां द्यावं? माझं विचारणं चूक आहे का?"

थोडा वेळ कोणीच बोललें नाहीं. नंतर खुलासा करण्याकरितां म्हणून तोच पुढें बोलूं लागला,

"ज्या ठिकाणीं परकेपणा असतो, तिथंच बहुवचनी संबोधनं संभवतात असं आपण पूर्वी एकदां वादविवाद करतांना ठरवलेलं आहे..."

"हो. आलं आलं ध्यानांत माझ्या. आपण वादविवाद करितांना हें एकच कां, अशीं अनेक तत्त्वं ठरविलेलीं आहेत. आपण बी. ए. चा अभ्यास करीत असतांना आपल्या वाचनांत येणारीं गहन गहन तत्त्वं विचाराकरितां पुढं मांडायचीं, तेव्हां त्यांत मला कांहीं समजलं नसलं तरी मला सुचेल तें मी आपली बडकत सुटत असें. ते मोठे विषय आपण सोडून देऊं. पण गमतीच्या वादविवादांत देखील आपण काय थोडेथोडके ठराव पास केले आहेत. 'लढाई आणि प्रीति यांच्या बाबतींत सर्व कांहीं ठीक दिसतं' ही जुनी इंग्रजी म्हण आपण नव्यानं पास केलेली आहेच. आपल्या पसंतीचा शिक्का या तत्त्वावर देखील बसविलेला आहेच कीं!" त्याच्याकडे तिरप्या डोळ्यानें पाहात वृंदा म्हणाली.

या बोलण्यांत कांहीं तरी खुबी खास आहे असें त्याला वाटलें, तथापि ती कोणती खुबी असावी याचा अंदाज त्याला होईना.

परंतु त्या तत्त्वावरून त्याच्या डोक्यांत मात्र विद्युल्लता चमकली. त्याची मुद्रा एकदम पालटली. पालटली म्हणजे जराशी प्रसन्न झालेली दिसली. त्याला कांहींतरी सुचलें असावें. तो थोडाच वेळ विचारमग्न होऊन नंतर लगेच म्हणाला,

"अगदीं खरं. तुम्ही म्हणतां..."

"तुम्ही?" त्याला मध्येंच अडवून वृंदा म्हणाली, "पुन्हा 'तुम्ही!' माझ्या हातांत फोटो पाहातांक्षणींच 'तूं' चा 'तुम्ही' झाला वाटतं! म्हणजे माझ्या ठिकाणीं परकेपणा आला? मला मागणी आलेली आहे, एवढीच काय ती गोष्ट घडलेली आहे; असें असून जर मी परकी आणि 'तुम्ही' झालें, तर मग तुम्ही परपुरुष या वेळीं माझ्या समोर—मी एकटी माझ्या खोलींत असतांना, माझी आई बाहेर गेली असतांना, माझा धाकटा भाऊ शाळेंत गेला असतांना-आणि म्हातारे आजोबा तिकडे आपल्या खोलींत बसले असतांना तुम्ही परके पुरुष अगदीं माझ्याजवळ खुर्चीवर येऊन कसे बसलांत हो? अहो तुम्ही! आतां बोला ना!"

"वृंदे! काय भडिमार चालवला आहेस हा..."

"ओहो! आतां गंमत झाली.! आतां खुशाल बोला. 'तुम्ही' चा 'तूं' झाला. आतां माझी हरकत नाहीं. आतां खुशाल बोला आणि हवं तेवढं बोला..."

"अग पण मला बोलूं तर देशील?"

"हो हो! बोला ना!"

"मला एवढंच सांगायचं आहे, कीं तो आपला जुना ठराव मला अगदीं पूर्णपणें मान्य आहे. लढाई आणि लग्न यांत सर्व कांहीं खपण्यासारखं असतं. मात्र तुला हें तत्त्व पूर्ण पसंत आहे ना? नीट विचार करून सांग..."

"तो विचार तुम्हीच करा. मला तर तें अगदीं कबूल आहे. लढाई आणि प्रेम यांत सर्व कांहीं चाललं पाहिजे, असं माझं ठाम मत आहे." असें बोलून ती बाहेर जाण्याची तयारी करूं लागली. तोहि उठला, इतक्यांत वृंदेचा भाऊ शाळेंतून आला. त्यानें आंत पाहातांच म्हटलें,

"मोहनराव, बाहेर तुम्हांला कोणीतरी बोलावीत आहे."

तें ऐकतांच तो, मोहनरावच तो, जलदीनें निघाला. सायकल घेऊन रस्त्यावर गेला. तेथून त्याला बोलावणारा कोण तो दिसलाच. त्यानें सायकल चालू केली.

त्याच्या मागोमाग वृंदाहि झपाझप चालूं लागली. तिला रोजच्याप्रमाणें व्यायाममंदिरांत जावयाचें होतें. मॅट्रिकच्या परीक्षेंत ती यथातथाच मार्क मिळवून जेमतेम सुटली होती. पण व्यायामांत ती पहिल्या नंबरची विद्यार्थिनी होती आणि म्हणून कन्या-व्यायामशाळेंत ती निर्वेतन व्यायाम-शिक्षिकेचें काम करीत होती. तो तिच्या आवडीचा विषय होता.

: २ :

त्या शहरांत सर्व विद्यार्थ्यांत शारीरिक बल-संवर्धनाच्या विषयांत चढाओढ लागली होती. पुरुष विद्यार्थ्यांत–हायस्कूल व कॉलेज–मोहन पहिला आला आणि विद्यार्थिनींत वृंदा पहिली आली होती. वृंदा हायस्कूलची विद्यार्थिनी आणि मोहन कॉलेजचा विद्यार्थी होता. व्यायामसंमेलनच्या व इतर प्रसंगांनीं त्यांना एकत्र येण्याला संधि मिळाली, ओळख झाली, स्नेह जमला. त्यांचीं मनें परस्परांकडे पूर्वीच आकृष्ट होऊं लागलीं होतीं. त्यांचा सहवास होऊं लागला. वृंदेला श्रीमंतांबद्दल

एक प्रकारचा तिटकारा होता. नुसतें खाऊन पिऊन सुखी असणारे, अंग मोडून मेहनत करण्यास तयार असलेले, आपत्काळीं उपयोगी पडण्यापुरता द्रव्यसंचय करण्याची इच्छा बाळगणारे असे लोक तिला चांगले वाटत. या तिच्या कल्पना वाईट नव्हत्या. त्या कल्पना अयोग्य असें म्हणण्याची मोहनची छाती नव्हती. पण त्याचे वडील साधारण कंजुष वर्गात मोडणारे असून, चांगले सधन व शेतवाडी, बंगला बगीचेवाले गृहस्थ होते. ते बडे सरकारी ऑफिसर होते; एक दोन वर्षांत ते पेन्शनर व्हावयाचे होते आरंभीं मोहननें आपली परिस्थिति वृंदेपाशीं सांगण्याचा जेव्हां जेव्हां प्रसंग आला, तेव्हां तेव्हां वरील वस्तुस्थितीपैकीं बऱ्याचशा गोष्टी त्यानें लपवून ठेविल्या होत्या. मी एक गरीब स्वभावाचा व साधारण सुखी परिस्थितीचा विद्यार्थी आहें असेंच त्यानें तिला भासविलें होतें. श्रीमंतींत जे दोष असतात ते आपल्यांत उतरणार नाहींत अशा खात्रीनेंच त्यानें वरील लपंडाव केला होता. वृंदा श्रीमंतीला भीत नाहीं, श्रीमंतीच्या पडद्याआड लपलेल्या दुर्गुणांना आणि पातकाला भिते हें त्याला पक्कें ठाऊक होतें. जगांतील श्रीमंतांत असले दुर्गुण असले तरी आपल्या कुळांत ते नाहींत हें सांगणें व वृंदेला पटवून देणें अगदीं अशक्य होतें.

वृंदेच्या आईला मात्र आपला जांवई श्रीमंत असावा असें वाटे. वृंदेशिवाय बाकी सर्वांचें मत तसेंच होतें. म्हणूनच हें नवें स्थळ आल्यापासून वृंदेच्या आईला आनंद झाला असावा असें मोहनला वाटे. पण मोहन मात्र दुहेरी संकटांत पडला होता.

बी. ए. झाल्यावर आपण नोकरी धरणार अगर अन्य शक्य तो व्यवसाय पतकरणार असें तो सांगत असे. वृंदेनेंहि मॅट्रिक झाल्यावर लग्नाचें पाहावयाचें ठरवलें होतें. तिला पुढचा अभ्यास करावयाचा नव्हता, करतां येणेंहि शक्य नव्हतें. तिच्याहि मनांत मामावर अवलंबून न राहातां आपण कोठें तरी एखाद्या संस्थेत नोकरी धरून स्वावलंबी व्हावेंसें होतें. पण लग्नाची अडचण मध्यंतरीं यावयाची तिचें काय ?

वृंदा आणि मोहन यांचा सहवास वाढत असलेला दृष्टोत्पत्तीस येतांच वृंदेच्या आईनें वृंदेला सावधगिरीची सूचना दिलेली होती. फार श्रीमंत स्थळ पतकरावयाचें नसलें, तरी साधारण श्रीमंत तें असावें; आणि तसें तें असल्याची

स्वतःची खात्री झाल्याशिवाय भावनावश होऊन आयुष्याचा नाश कोणींहि करून घेऊं नये असा तिचा वृंदेला नेहमींचा उपदेश असे.

"मी कध्धीं तशी फसायची नाहीं." असें वृंदा आईला खात्रीपूर्वक सांगत असे. आणि तिच्या शब्दावर तिच्या आईचा पूर्ण भरंवसा होता.

वृंदा खुल्या वातावरणांत वागणारी, धाडसी, धीट, निर्भीड व साहसप्रिय होती. ती उफाड्याची आणि व्यायामप्रिय असल्यामुळें तिच्या वयाच्या मानानें ती बरीच पुढें दिसे. तिच्या लावण्याला आरोग्यदेवतेचा कृपाशीर्वाद मिळाला होता. त्यामुळें तिचें सौंदर्य इतकें रेखीव, इतकें भरगच्च आणि इतकें उठावदार दिसे, कीं चित्रकार व शिल्पकार यांचे डोळे स्तिमित व्हावे. पण तिच्यांत मार्दवहि होतें. मात्र नेभळटपणा नव्हता. त्यामुळें जी नजर निर्विकार नसेल ती तिच्या नजरेस भिडणेंच शक्य नव्हतें.

ज्या संस्थेंत ती व्यायाम शिकविण्यास म्हणून जात असे, त्या संस्थेमार्फत सर्वसाधारण व्यायामक्रम ठरविण्याकरितां म्हणून लहानसें तज्ज्ञांचें संमेलन भरलें होतें. बरेचसे व्यायामशास्त्रज्ञ जमले होते. वृंदा व मोहन या सभेचें काम आटोपल्यावर जावयास निघालीं. त्या दिवशींच्या संवादानंतर मोहन वृंदेच्या घरी गेलाच नव्हता. क्वचित् मध्यंतरीं कुठें गांठ पडल्यास आपण नोकरीच्या शोधांत आहों असें तो सांगत असे. वृंदेला दुसरें स्थळ आल्यामुळें ती लवकरच दुसऱ्याची होणार आणि या इतक्या महत्त्वाच्या गोष्टीबद्दल वृंदेला कांहींच का वाटूं नये? आपण असली व्यायामप्रिय मुलगी निवडण्यांत चूक तर नाहीं केली? दुसरी एखादी भावनामय मुलगी असती, तर तिनें इतक्यांत आपल्याला पत्रें कितीं पाठविलीं असतीं, अश्रु किती काढले असते, आणा शपथा किती वाहिल्या असत्या आणि प्रेमाविष्करणाचे अन्य मार्ग किती धुंडाळले असते. पण ही वृंदा उलट साऱ्या गोष्टी हशावारीच घालवते! हिला अंतःकरण नाहीं कीं काय? कीं व्यायामाचा असला परिणाम पुरुष-मनावर न होतां स्त्री-मनावरच असा चमत्कारिकपणें घडून येत असतो?

आपण काय करावें हें त्याला सुचत नव्हतें. वृंदा काय करते हेंच त्याला पाहावयाचें होतें. आणि ती करील तदनुरूप आपण तरी कांहीं धडपड करून पाहावी असें त्यानें ठरविलें होतें.

"बरं, मी जातों या बाजूला." एका तिठ्यापाशीं येतांच मोहन म्हणाला.

त्याची न बोलकी आणि विचारमग्न चर्या तिनें ताडली होती. तिच्याहि मनाची हुबेहुब तशीच स्थिति झाली होती.

" कां ? पुढच्या रस्त्यानें जा ना ?" मोहन विचारांत पडला. ही आपणांला घरापर्यंत देखील बोलावीत नाहीं ! पुढच्या तिठ्यावरूनच जा म्हणून सुचविते आहे. घरीं जर तिनें बोलाविलें असतें, तर मोहनच्या मनाला थोडा धीर आला असता. त्यामुळें नकार देण्याचें त्यानें ठरविलें.

" मला या चार दिवसांत बाहेरगांवीं जावं लागणार आहे." वृंदा म्हणाली.

" कोणत्या बाजूला ?" मोहननें पृच्छा केली.

"माझं लग्न लवकर ठरवायचं आहे व त्या दिवशीं सांगितलेलंच स्थळ शेवटीं त्यांनीं मला न विचारतां ठरवूनहि टाकलं असं ऐकतें." ती थोडीशी नाखुषी दर्शवून म्हणाली.

" मग काय झालं त्यांत ? वडील माणसं करतील तें लहान मुलांच्या कल्याणाचंच करतील." मोहननें मुद्दाम बाण सोडला.

वर्मी लागलेला बाण तिथंच राहूं देत वृंदेनें उत्तर केलें, " पण मला कोणींच का विचारूं नये ?"

" कशाला विचारायला हवं ? आज्ञाधारक मुलांना स्वतःची अशी निराळी आवड असावयाची नाहीं हें वडील माणसांना ठाऊक असतं. तुझं तसं निराळं त्यांच्या विरुद्ध मत तर नाहीं ना ?"

" पण मला त्या गृहस्थाचा स्वभाव, गुण वगैरे कांहींच माहीत नाहीं. शिवाय नेहमींच्या बाहुलाबाहुलीच्या लग्नासारखीं ठरीव पद्धतीचीं लग्नं मला आवडत नाहींत." असें म्हणून वृंदेनें मोहनच्या चेहऱ्याकडे पाहिलें. अजूनहि तो विचारमग्न होता.

" मग काय बेत आहे तुझा ?"

" मला वाटतं, कांहींतरी करून या गृहस्थांची माहिती मिळवावी. मग त्यापूर्वी मला मामांना आणि मावशीला भेटतां आलं तर अधिक चांगलं होईल."

" मग त्यांत काय अवघड आहे ? यावं जाऊन मिरजेवरून. कधीं निघणार आहेस ?"

" बहुतेक परवांच निघावं म्हणतें मी. कारण लग्न येत्याच आठवड्यांत

धरलं आहे असं ऐकतें."

"ठीक आहे, अच्छा!" मोहन म्हणाला. वृंदा आपल्या घराकडे निघाली. मोहन सायकलवरून दुसरीकडे निघाला.

थोड्याच अंतरावर त्याला त्याचा एक मित्र भेटला.

"कसं काय मोहनराव? कुठपर्यंत आला आहे तुमचा रोमान्स?"

"रोमान्स कसला न् काय? मला घरीं जाऊन यायचं आहे, तोंपर्यंत माझीं एकदोन कामं मी तुझ्यावर सोपविणार आहें. तुझ्याकडेच येत होतों मी."

"काय बर कामं आहेत तुझीं? तुझीं कामं असायचीं म्हणजे रोमान्सचीं. हं, काय आहेत कामं?"

"कॅन्टोन्मेंटमधील अर्देसर फोटोग्राफरकडे जायचं आणि त्याच्या स्टुडिओमधील एक अतिशय सुंदर असा तरुण मुलीचा फोटो घेऊन तो ताबडतोब मी देतों त्या पत्त्यावर पाठवून द्यायचा. मला तोंपर्यंत बऱ्याच गोष्टी उरकायच्या आहेत." असें म्हणून एका नोटपेपरच्या तुकड्यावर चार ओळी लिहून त्यानें त्याच्याकडे दिल्या आणि तो पुढें निघाला. पण लगेच तो मागें फिरला; कारण त्याच्या मित्रानें त्याला हांक मारली होती.

"तूं कधीं जाणार घरीं आपल्या, बेळगांवला?" त्याच्या मित्रानें त्याला विचारलं.

"मी परवांच रात्रीं जाईन मेलनं बेळगांवला." मोहननें त्याला ऐकूं जाईलसें मोठ्यानें ओरडून सांगितलें आणि तो पुढें निघाला. जातांना त्याच्या जवळूनच चार पांच मुलांचा घोळका चालला होता, त्यांतील एका मुलानें मोहनच्या तोंडांतील शब्द ऐकून मोहनकडे पाहिलें होतें. मोहन सायकलवरून घाईनें पुढें निघाला.

: ३ :

त्या रात्रीं मेलला फार गर्दी होती. मोहन पूर्वीच स्टेशनवर आला होता व तो गाडींत बसावयास येणाऱ्या पॅसेंजरांकडे पाहात राहिला होता. थोड्या वेळानें वृंदा आली व तिकिट काढावयास जाऊं लागली. मोहननें लगेच तिला गांठलं. तिच्या हातांत फक्त एक पुस्तक होतें. बॅग आणि बिछाना हमालाच्या डोकीवर होता.

"आपलीं दोघांचीं तिकिटं मीं पूर्वीच काढून ठेवलीं आहेत; नाहीं तर मिळालीं नसतीं आयत्या वेळेस."

"अस्सं?" विचार करीत वृंदा म्हणाली.

"कां? संकोच वाटत असल्यास मी पैसे घ्यावयास तयार आहें."

"मी तेंच म्हणत होतें. पण तुम्ही कुठवर निघालां आहांत?" वृंदेनें विचारलें.

"मी बेळगांवपर्यंत जाणार आहें. तुला मावशीकडे हुबळीला जायचं आहे ना?" मोहननें विचारलें.

"मी तोच विचार करीत होतें. हुबळीहून येऊन मिरजला उतरावं, कीं मिरजेला आधीं उतरून मग हुबळीला जावं याचा अद्याप निश्चय होत नाहीं."

"मी त्यावर एक उपाय सुचवतों तुम्हांला. एक मात्र अगोदर सांगून ठेवतों, कीं पूर्वी जरी आपण कांहींहि ठराव पास केले असले, तरी ते आता तसेच पाळले पाहिजेत असं कांहीं नाहीं. तेव्हां मी आतां बोलतांना 'तुम्ही,' 'तुम्हांला' असंच म्हणेन आणि तुम्हींही त्याला आडकाठी घेऊं नये."

इतकें बोलणें होईतों, एक बोहरी समोरून जात होता, त्यानें वृंदेस ओळखलें. आदरपूर्वक त्यानें वृंदेस हाक मारली आणि विचारलें,

"आज आहेत का कांहीं जिन्नस तयार?"

वृंदेनें झटपट हमालास हाक मारून मागें परतविला आणि बॅग उघडून पोतकामाचे व विणकामाचे कांहीं सुंदर नमुने दाखविले. बोहऱ्यानें ते मोठ्या खुषीनें सगळेच घेतले व मागचा हिशेब आणि आतांच्या खरेदीचा मिळून एकंदर सत्तेचाळीस रुपये दिले आणि नवीन नमुन्यांची ऑर्डर देऊन तो चालता झाला. त्याच्याबरोबर दुसरा एक चावट मित्र होता. तो सारखा वृंदेकडे टक लावून पाहात होता. जाऊं लागतांच तो वृंदेविषयीं चेष्टेखोरपणानें कांहींसें बोलला, त्यावर त्या माल घेणाऱ्या बोहऱ्यानें त्याची चांगलीच कानउघाडणी केली. तें त्यांचें संभाषण या दोघांच्याहि कानावर अर्धवट आलें होतें.

त्या सत्तेचाळीस रुपयांतून आपल्या सेकंडक्लास तिकिटाचे पैसे लगेच तिनें बाजूला काढून खिशांत ठेविले.

गाडींत गर्दी अतिशयच होती. मोहननें सेकंडक्लास बर्थस् राखून ठेविले होते म्हणून बरें झालें.

गाडी निघावयास थोडासा अवकाश होता. नीटपणें बसल्यावर वृंदेनें विचारलें,

" तुम्हीं माझं तिकीट कोणत्या स्टेशनचं काढलं आहे ? "

" तुम्हांला कोणत्या स्टेशनचं पाहिजे ? "

" म्हणजे ? तुम्ही सगळया स्टेशनचीं तिकिटं काढलीं आहेत कीं काय ! "

" कोणीहि पॅसेंजर कांहीं एकाच खेपेस सगळया स्टेशनांची यात्रा करीत नाहीं. "

" पण मी कुठं उतरणार हें तुम्हांला कसं समजलं ? "

" मला नाहींच समजलेलं अजून. मी तुमचं मिरजेचं तिकीट काढलेलं आहे. "

" ठीक आहे. हे घ्या आपले पैसे. " मोहननें पैसे घेतले.

" बरं, तुम्ही जो उपाय सुचवतों म्हणालां होतां, तो काय बरं ? "

" तो सांगतों आतां. " कोठल्याशा मासिकाचा अंक वाचण्यासाठीं बाहेर काढीत मोहन म्हणाला. वृंदेनें आपलें बॅगेंतलं सामान काढून वीणकाम सुरू केलें होतें.

" मी असं सुचवितों, कीं तुम्हीं मिरजेला अथवा हुबळीला न उतरता बेळगांवला यावं माझ्याबरोबर. "

" कां ? तिथं तुमचं घर आहे कीं काय ? तुमचं घर कुठंसं दुसरीकडेच आहे म्हणतां ना ? "

" माझ्या घरीं यायचं असेल आमचं घर पाहायला, तर उत्तमच आहे; पण आज मी बेळगांवला आईला भेटायला चाललों आहें. आई आजारी असल्यामुळं तिला ठळकवाडीस एक भाड्याचं घर घेऊन हवेसाठीं ठेविली आहे. माझी धाकटी बहीण देखील तिथंच आहे. वडील विजापूरला नोकरीच्या गांवीं आहेत. मी घरीं यायला पुष्कळ दिवस बघत होतों, पण आज जुळलं. मी येणार म्हणून इकडे बहिणीला आणि तिकडे बाबांना कळवून ठेवलं आहे. बाबाहि मला लग्न करून घेण्याविषयीं टुमणं लावीत आहेत. मला त्यामुळें जरा अस्वस्थ वाटल्यासारखं होत आहे. "

" असं वाटण्याचं कारण ? " वृंदेनें आतुरतेनें विचारलें.

" कारण कांहीं तसं विशेष नाहीं म्हणण्यासारखं, पण मग तुमचा विचार काय ठरला ? "

वृंदा विचारांतच राहिली. तितक्यांत वरच्या बर्थवर एक तिसरा पॅसेंजर आला. गाडी सुटण्याची वेळ झाली. त्यांना आतां आपलें बोलणें आटोपणें भाग होतें.

" मला देखील चारसहा दिवसांमागं माझ्या एका मावसबहिणीचं पत्र आलं आहे. तिच्या नवऱ्याची बदली हल्लीं शहापुरला झाली आहे. तिलाहि मला भेटायचं आहे. स्टेशनवर येईपर्यंत माझा बेत ठरला नव्हता; पण आतां माझा प्रोग्राम मीं ठरवला..."

" ऐकूं तर खरा..." मोहननें जिज्ञासापूर्वक विचारलें.

" मी प्रथम तुमच्याबरोबरच उतरतें, दुपारून माझ्या मैत्रिणीकडे जाईन. ठरला माझा बेत. "

" ठीक आहे. तसंच करावं असंच मलाहि वाटतं. मलाहि याच खेपेस धंद्यांत पडावं, कीं नोकरी पतकरावी तें ठरवून टाकायचं आहे. धंद्यांत पडण्याचाच माझा बेत आहे व त्याची पूर्वतयारी करण्याकरितांच मीं इतके दिवस काढले. "

इतकें बोलणें झाल्यावर मग कोणी कांहीं विशेष बोललें नाहीं. वृंदा आपलें काम करीत बराच वेळ बसली होती. मोहन मात्र वाचीत पडला होता.

परंतु त्याच्या डोक्यांत बरेचसे विचार घोळत होते. वृंदेच्या वर्तनावरून तिचें अंतरंग त्याला ओळखतां येईना. आजपर्यंत एकाहि पुरुषाला तिनें वागण्यांत अगर बोलण्यांत मोहनच्या इतकी सलगी करूं दिली नव्हती. एकंदर रागरंगावरून ती आपणांस अनुकूल आहे असें त्याला खात्रीपूर्वक वाटत होतें. लग्न जुळल्याची वार्ता ही निव्वळ गप्प म्हणावी, तर तो फोटो आणि त्याच कामासाठीं मामाचें आणि मावशीचें मत घेण्यासाठीं ही निघाली होती. ज्या दिवशीं तो फोटो वृंदेच्या हातांत मोहननें पाहिला, त्या दिवशीं वृंदेच्या आईकडे लग्नाच्या गोष्टी काढण्याच्या हेतूनेंच तो आला होता. तिची आई आपल्याकडे कांहीं बोलेल म्हणून इतके दिवस वाट पाहून त्याची निराशा झाली. स्वतः गोष्ट काढण्यांत त्याला कमीपणा व

लाज वाटत होती, पण त्या दिवशीं त्या विषयास निराळीच दिशा लागली आणि त्या दिशेनें वाहात जातां जातां मुक्काम येथवर येऊन ठेपला. मोहन अशा प्रकारच्या विचारांत मग्न असतां मधूनमधून वृंदेच्या सुमधुर लावण्याकडे चोरनजरेनें पाहात असे व नंतर डोळे मिटून भविष्यकाळच्या अंधारांत डोकावून पाही. जणूं काय वृंदेच्या मुखचंद्राचा एकेक किरण त्याला भविष्यकाळची वाटचाल चालण्यांत मार्गदर्शक होत होता.

वृंदेच्या मनाची स्थिति देखील तशीच झाली होती. तिसरा पॅसेंजर आला, तेव्हां त्या दोघांच्या जिवाला हायसें वाटलें. वृंदेला आपण टाकलेलें पाऊल योग्य आहे कीं नाहीं याची शंका वाटत होती. ती मनाची खंबीर होती. तिनें मोहनच्या बिऱ्हाडीं जायचा बेत केला. मोहनची बहीण आणि आई आपणास उद्यां पाहावयास मिळतील; पण मोहनबरोबर आपण जात आहोंत व त्याच्या घरीं राहाणार आहोंत या आपल्या वागणुकीबद्दल त्या मंडळीला काय वाटेल ? या व इतर काल्पनिक प्रकारांचा विचार करतां करतांच तिला झोंप येऊं लागली. हातातलें काम ठेवून व बॅग बंद करून ती झोंपी गेली.

: ४ :

बेळगांव स्टेशनवर गाडी येतांच वृंदा आणि मोहन खालीं उतरलीं. मिरज ते बेळगांवपर्यंतचा ' एक्सेस चार्ज ' मोहननें देऊन टाकला आणि मोटारवाल्याला खूण केली. मोटार चालू झाली. थोडक्याच वेळांत तीं दोघें एका टुमदार बंगल्यांत उतरलीं. त्यांचें सामान फारसें नव्हतेंच. ड्रायव्हरनें बिछाने काढून खालीं ठेवले, मोलकरीण ते आंत घेऊन गेली.

" आपला गडी गांवीं गेला आहे दोन दिवसांसाठीं, तो आज येईल, दादा. " एक तरुण मुलगी बाहेर येऊन म्हणाली. ती चलाख आणि सुंदर होती. हीच ती मोहनची बहीण असें वृंदेनें ठरविलें.

" कुसुम, " मोहन म्हणाला, " यांची तुझी कशी काय मैत्री जमते पाहा बरं. या संध्याकाळपर्यंत आपल्याकडे पाहुणचाराला राहातील. त्यांना वरती माडीवर ने आणि मग स्नानासाठीं खालीं घेऊन ये. "

कुसुम आणि वृंदा वर गेल्या. मोहन कपडे उतरीपर्यंत त्याची आई बाहेर आली होती, तिच्याबरोबर बोलत तो घरांत गेला.

वृंदेच्या लक्षांत येऊन चुकलें, कीं काहींतरी गडबड त्या घरांत चालली

आहे. माडीवरून खालीं उतरल्यापासून तिची चर्या पार बदलून गेलेली मोहनच्या लक्षांत आली. तो कशाचा परिणाम तें त्यानें ताडलेंच. घरांत बोलणीं चाललीं असलीं तरी तीं लग्नाचींच असत. सणगे घेण्याबद्दलच्या गोष्टी तर तिनें दोनतीनदां ऐकल्या होत्या. घरांतला गडी बाहेर गेला होता तो देखील असल्याच कांहींशा कामगिरीवर गेला होता, असें तिला समजलें होतें.

दुपारीं जेवणाचा वेळ झाला. वृंदा जवळच होती. मोहननें कुसुमला बाबांचें पत्र आणून वाचावयास सांगितलें.

"××× तूं इतक्यांत ठळकवाडीला आला असशील अशा समजुतीनें हें पत्र ठळकवाडीच्याच पत्त्यावर पाठवीत आहें. मागील पत्रांत कळविल्याप्रमाणें हें स्थळ मीं कायम केलें आहे व तुझी त्याला पसंती आहेच. तेव्हां हें लग्न लवकरच उरकावें असा माझा बेत आहे व त्याप्रमाणें सर्व तयारी करावयाची आहे. बाकी मजकुराचें पत्र मागाहून पाठवितों. ×××"

विशेष कांहीं बोलणें झालें नाहीं. फक्त "ठीक!" असें मोहननें म्हटलें व तो निघून गेला. वृंदा व कुसुम जेवायला बसलीं. बरोबर मोहनची आईहि होती. सैंपाकीणबाई वाढीत होती.

जेवणें झाल्यावर मोहन माडीवर एकदां जाऊन आला. वृंदेला दिलेल्या खोलींतून खालीं उतरत असतां त्याची व कुसुमची नजरानजर झाली. वृंदेचें तिकडे लक्ष नव्हतें.

वृंदा आणि कुसुम माडीवर गेल्या. तिनें त्या ठिकाणच्या टेबलाच्या ड्रॉअरमधील फोटो पुनः एकवार बाहेर काढून पाहिला; आणि तो जागच्या-जागीं ठेवून ती जवळच तिच्यासाठीं तयार ठेवलेल्या बिछान्यावर कलती झाली. तिची मुद्रा दुःखित झालेली दिसत होती.

"झोंपायचं आहे का?" कुसुमनें विचारलें.

वृंदेनें मानेनें नकार दर्शविला.

इतक्यांत खालीं कोणी हाक मारीत असल्याचें ऐकून कुसुम खालीं गेली, तोंच मोहन वर आला.

"तुम्हांला बरं वाटतं ना? शहापूरला किती वाजतां जायचं? गाडीवाला गेला होता तो आतां आला आहे नुकताच."

मोहनच्या या बोलण्याला वृंदेनें कांहींएक उत्तर दिलें नव्हतें; पण तिच्या

मनांतून पुष्कळ बोलायचें होतें असें तिच्या बोलूं इच्छिणाऱ्या मुखचर्येवरून दिसून येण्यासारखें होतें. इतक्यांतच कुसुम मोहनकडे एक छापील कार्ड घेऊन आली.

"दादा, खालीं छापखान्याचा माणूस हें कार्ड तपासून घेण्यासाठीं आला आहे व हें त्यांचें पत्र आहे"

मोहननें उभ्या उभ्याच तें पत्र वाचून पाहिलें व तो फारच रागावला. त्यानें आरामखुर्चीवर बसतां बसतां त्या पत्राचे तुकडे तुकडे केले.

"काय ही बाबांची घाई. बाकी सगळ्या गोष्टी झाल्या तरी हरकत नाहीं, पण माझ्या लग्नाच्या आमंत्रणपत्रिकासुद्धां छापून घ्यावयाची घाई कशाला करायला हवी होती ?"

असें म्हणून त्यानें ती लग्नपत्रिका मोठ्यानें वाचून दाखविली.

"शाबास ! आमचा मुलगा मोहन; तमक्याची मुलगी तमकी ! अमका मुहूर्त ! अन् तमकं ठिकाण. वाच कुसुम तूंच ती पत्रिका !" असें म्हणून ती पत्रिका मोहननें कुसुमच्या अंगावर फेंकली. कुसुम आणि वृंदा एकाच ठिकाणीं बसल्या होत्या. कुसुम ती पत्रिका स्वतःकरितां म्हणून वाचूं लागली, पण वृंदेला ती चक्क दिसत होती.

मोहन धडपडत खालीं रागानें पाय आपटीत गेला. कुसुमनें ती पत्रिका तिथेंच टाकली आणि तीहि मागोमाग गेली. तीं दोघें गेल्यावर वृंदा ती पत्रिका उचलून घेऊन वाचूं लागली. तिचें मस्तक फिरूं लागलें. तिला रडण्याचा हुंदका आवरेना. तिच्या डोळ्यासमोर काजवे चमकूं लागले. काय करावें हें तिला मुळींच सुचेना. एकवार वाटे, आपण पुनः मागें परतून आईकडे जावें आणि तिच्या कुशींत तोंड घालून पोटभर रडावें. एकवार वाटे, खरोखरच मामांकडे जावें आणि परिस्थितीचें विस्मरण होतें कीं काय तें पाहाण्याचा प्रयत्न करावा. तथापि येथून निसटावें कसें ? इतकी ती धीराची, पण गात्रें गळाल्यासारखें तिला झालें. पुनः तिला वाटे, कीं शहापूरला आपल्या मावसबहिणीकडे जाऊन दोन दिवस घालवावे. पण तो विचार तिनें मनांतून धुडकावून लाविला. कारण शहापूर बेळगांव-ठळकवाडीच्या अगदीं जवळ असल्यामुळें मोहनच्या लग्नाचे प्रतिध्वनि तिच्या कानांत एकसारखे पडत राहिले असते. मोहनसारखा कठोर पुरुष दुसरा कोणी

पुरुष जातींत असेल असें तिला वाटेना. या वेळीं कोणीतरी जवळ पाहिजे होतें. तिला कोणाच्या तरी आधाराची आवश्यकता होती. अचानक त्या माडींतून उडून जर तिला जातां आलें असतें, तर तिला बरें वाटलें असतें. कारण यापुढें कोणत्याही गोष्टींत मोहनची मदत तिला घ्यावयाची नव्हती. परंतु करते काय ? येऊन पडली मोहनच्याच घरांत. शिवाय तें घर भाड्यानें म्हणून मोहन म्हणाला होता; पण तें तिला बिलकूल खरें वाटेना. तिला अशा प्रकारें काय करूं आणि काय नको असें होऊन ती तळमळत असता मोहनच वर आला.

"तुम्हांला शहापूरला जायचं आहे ना ? गाडी जोडायला लावली आहे खालीं." मोहन म्हणाला. पण वृंदेच्या स्थितीकडे पाहून त्यानें मान फिरविली आणि तो खालीं उतरला. वृंदेच्या मानसिक यातना तिच्या मुखावर प्रतिबिंबित झाल्या होत्या, त्या त्याच्यानें पाहावेनात. पण त्यापूर्वी त्याच्याहि मनाला तशाच यातना झालेल्या होत्या.

इतक्यांत कुसुम वर आली. तिला पाहातांच लिहिण्याचें साहित्य वृंदेनें मागितलें आणि ती लिहावयास बसली. बराच वेळपर्यंत ती लिहीत होती. तिनें आपलें लेखन आटोपल्यावर तो कागद एका लिफाफ्यात घालून, बंद करून त्याच्यावर मोहनचें नांव लिहून तो तिनें कुसुमकडे दिला आणि कुसुमलाच फक्त 'येतें' म्हणून ती तडक गाडींत जाऊन बसली. गाडीवाल्याला तिनें आपल्या मावसबहिणीच्या बिऱ्हाडाचा पत्ता सांगितला आणि गाडी चालू झाली.

ती निघून गेल्यानंतर कुसुमला दुसरीकडे काम लावून मोहन माडीवर गेला त्यानें इकडे तिकडे पाहिलें आणि कुसुमच्या हातून मिळालेलें पत्र उघडलें.

'×××××× एकंदरींत शेवटीं हा असा परिणाम झाला. आता तुमचें लग्न होणारच आहे. त्या अर्थी माझें मन उघडें करण्यास मला संकोच वाटण्याचें कारण नाहीं. मीं फोटो दाखविला तो मला माझ्या एका मैत्रिणीच्या पुस्तकांत खुणेसाठीं घातलेला मिळाला. तुमची गंमत करण्याकरितां म्हणून मीं त्या दिवशीं त्या फोटोचा तसा उपयोग केला. वेळ फार विखारी होती. मला तशी दुष्ट बुद्धि सुचली. तुमचें मन तपासून पाहावें अशी मला बुद्धि झाली. पण तुमचें मन चंचल असेल असें मला वाटत नव्हतें. मी

मात्र फसणार होतें. माझें लग्न ठरलें आहे असें जें मीं सांगितलें तें केवळ त्याचा तुमच्या मनावर काय परिणाम होतो हें पाहाण्याकरितांच सांगितलें होतें. शिवाय तुमचें घर व घरची मंडळी पाहावयास मिळावी अशीही माझी मनांतली इच्छा होती. दरम्यान तुमची वाग्दत्त वधू छायाचित्राच्या रूपानें तुमच्या टेबलाच्या खणांत असलेली मीं पाहिली. थोडक्याच वेळांत लग्न-पत्रिका आलेलीहि पाहिली. आपल्या वडिलांचें पत्रहि ऐकलें आणि मी समोर असल्यामुळेंच केवळ मनास थोडी लाज वाटून हें लग्न आपणास पसंत नसल्याचा आपण केलेला कांगावाहि पाहिला. सर्व नाटक पाहिलें, यांत माझ्या जन्माचें मात्र नाटक झालें! अखेरपर्यंत मला कांहींएक थांग लागूं दिला नाहीं. मी खरोखर फसणार होतें, यांत मात्र शंका नाहीं. याउपर आपली भेटहि होऊं नये व पत्रव्यवहारहि होऊं नये अशी माझी इच्छा आहे. पुढच्या आयुष्याची रेषा रेखाटून मला यापुढें जीवितयात्रा कशी आणि कोणच्या मार्गानें चालवावी याचा विचार करावयाचा आहे. ईश्वर आपणास सुखी ठेवो. माझे बाबा देवाच्या घरीं गेले. आज माझ्याबरोबर माझी आई आणि मागें माझा धाकटा भाऊ नसता तर–तर मी निराळाच मार्ग धरला असता. परंतु–जाऊं द्या. × × × ×"

पत्र वाचल्यावर मोहनच्या डोळयांत अश्रु उभे राहिले. वृंदेच्या थट्टेचा पहिला परिणाम मोहनच्या मनावरहि असाच झाला होता. पण लगेच त्यानें डावाला डाव लढवावयाची जय्यत तयारी केली. त्यानें ओळखलें, कीं वृंदेचा डाव फसवेगिरीचा खास आहे. कदाचित् नसलाच असें निदर्शनास आलें तर मग पुढचें पुढें पाहातां येईल. पण तिला ठळकवाडीला आणून तोंडीस तोंड दिल्यावर ती मर्दानी मनाची हिंमतवान वृंदा दुसरा उलट डाव टाकल्याशिवाय राहावयाची नाहीं अशी त्याची पक्की खात्री होती पण प्रेमाच्याच बाबतींत तेवढी धीराची खंबीर वृंदासुद्धां इतकी विरघळून जाईल अशी त्याची मुळींच कल्पना नव्हती. त्यानें लगेच सायकल काढली आणि शहापूरचा रस्ता धरला.

धमनी शहापूरच्या रस्त्याला लागल्यानंतर गाडीवाल्यानें पाहुणीबाई बोलते कीं काय हें पाहाण्याचा प्रयत्न सुरू केला होता. खरें म्हटलें, तर आपल्या धन्याच्या घरीं आतां लग्नसमारंभ असल्यामुळें त्याला साहजिकच फार आनंद

झाला होता. तो गाडीवाला जात्याच उल्हासी, मनमोकळा आणि बोलका होता. गाडीवाला या नात्यानें धन्याच्या घरच्या लग्नसमारंभांत आपल्याला एक प्रकारचें महत्त्व येणार असें त्याला वाटत होतें. पाहुणीला आनंदांत भागीदार करण्याच्या हेतूनें तो मधूनमधून मागें वळून बोलूं लागला.

"तुमी ऱ्हानार व्हय लगीन व्हयीस तवर?"

"कुठलं लगीन?" आपल्या मनांतलं दुःख दुसऱ्यास दिसूं न देतां लपवून ठेवण्याच्या उद्देशानें वृंदेनें विचारलें.

"हें कुसुमताईचं लगीन, आज दुसऱ्या कुनाचं असायचं? दादासाब तर लगिनच करून घेईत न्हाईत."

वृंदेला हें गौडबंगाल कांहींच समजेना. गाडीवाले दारूबाज असतात. यानेंहि तसाच तांब्ड्या पाण्याचा घोट तर घेतला नसेल.

"मला नाहीं समजलं तूं काय म्हणतोस तें, पुनः सांग बघूं, पुनः... "

"आव! ताईसाबाचं लगीन जुळलाया ते व्हयीस तवर तुमी ऱ्हानार कि जानार आस मी हटकल."

"अन् पुढं काय म्हणालास?"

"दादासाबाचं अन् ताईसाबाचं आशी दोनी लगिन संगतच करूं या आस थोरले धनीसाब म्हनायच. पन दादासाब ऐकनात. आपलं लगीन नकोच आस त्ये म्हंशाल. त्यांची कालिजांत का इस्कुलांतल्या कुणा पोरीशीं वळख झालिया आस म्हनूत्यातबा! कालिजांत शिकलेल लोक काय नइ नइ तराच करूं लागल्यात! हे: हे:" तो जाणाऱ्या लोकांस बाजू देण्याकरितां बैलांस चुचकारूं लागला.

वृंदेचें डोकें शून्य–बधिर–अगदींच संवेदनाशून्य झालें!

इतक्यांत गाडीवाल्याचे दादासाबच सायकलस्वार बनून पाठीमागून आले. ते गाडीच्या समोर आले आणि त्यांनीं गाडी पाठीमागें वळवायला गाडीवाल्यास सांगितलें. गाडीवाला फारच बुचकळयांत पडला. गाडीवाल्याला त्यांनीं गाडी खानापूर रस्त्याला वळवायला सांगितली आणि आपण खानापूर रस्त्याला लागले.

सुमारें मैल सव्वामैल गाडी त्या रस्त्याला चालत होती. गाडीचे बैल जवान होते. ही धमनी नवी आणि दिसण्यांत सुंदर होती. मोहन रस्त्याच्या

बाजूलाच उभा होता. त्यानें गाडीवाल्यास इशारा दिला. गाडी थांबली. मोहननें वृंदेला हांक मारली. वृंदेनें उत्तर दिलें नाहीं. त्यानें आंत डोकावून पाहिलें, तों वृंदा डोळे किलकिले करून झोंपेंतून जागी झाल्याप्रमाणें आपणाकडे पाहात आहे असें त्यास दिसलें. त्यानें तिला खालीं उतरावयास सांगितलें.

डोळे चोळीत ती हळू खालीं उतरली. आतां चांदणें पडूं लागलें होतें. रस्त्याच्या बाजूला चांगलें मोकळें मैदान होतें. त्या बाजूला कांहीं अंतरावर मोहन आणि वृंदा जाऊन बसलीं. वारा शांत वाहूं लागला होता. वृंदेला मूर्च्छा येऊन गेल्यासारखें झालें होतें. तिला आतां या प्रसन्न वेळीं हुषारी वाटूं लागली.

मोहननें पत्र वाचल्यानंतर त्याला वाटूं लागलें होतें, कीं निराशेमुळें व प्रेमभंगामुळें वृंदा आपल्या जीवितास कोणती दिशा लावील नकळे. यासाठीं आपल्या वर्तनाचा एकदाचा खुलासा करून तिची चित्तवृत्ति पूर्ववत् प्रसन्न करावी.

वृंदेला वाटत होतें, कीं आपण प्रथम फोटो दाखवून मोहनची निराशा केली, तेव्हां अर्थातच त्यास दुसरी वाटेल ती नवरी पसंत करण्याचा मार्ग मोकळा झाला. तरी देखील त्यानें दुसऱ्या मुलीशीं लग्न न करण्याचा निश्चय कायम ठेवला होता असें गाडीवाल्याच्या बोलण्यावरून दिसतें. तो प्रकार खरा असल्यास पाहावा आणि तसें असल्यास आपण लिहिलेल्या कठोर पत्राबद्दल माफी मागावी.

त्यांचे दोघांचे असे हेतु होते. बराच वेळपर्यंत तीं चांदण्यांत बोलत बसलीं होतीं. तथापि त्यांच्या बोलण्यांतील एखादा दुसरा शब्द अगर वाक्य वाऱ्याच्या झोताबरोबर रस्त्यापर्यंत ऐकूं येत असे.

त्यांतील कांहीं शब्द पुढीलप्रमाणें होते.

"...तुमचा जाण्याचा नक्की दिवस मला माझ्या धाकट्या भावानं सांगितला आणि त्याच दिवशीं मी निघालें. त्यानं तुमचा नक्की दिवस शाळेंतून येतांना ऐकला होता..." ती म्हणाली.

"......तूं जसा मला पुरुषाचा फोटो दाखविलास, तसाच मी एक सुंदर स्त्रीचा फोटो पैदा करून तुझ्या नजरेस घातला. माझी पत्नी होण्यास

तुझ्याशिवाय दुसरी कोणीच ......" तो म्हणाला.

" आईला वाटे, आपला जांवई फार श्रीमंत असावा. मला कोणाशीं लग्न करायचं तें मीं ठरवून टाकलंच होतं, पण त्या ठिकाणीं माझ्या आईच्या इच्छेप्रमाणं जुळून येणार कीं माझ्या......मला दुसरं स्थळ नकोच होतं...... मला माझ्या आईची इच्छा पूर्ण होणार असं दिसूं लागलं..." ती बोलत होती.

"...पण मी कसा आहें...तें...आपण...मी शेतीभाती आणि बागबागाईत....गरिबांचं दुःखहरण...मी तुला पुष्कळ त्रास...होऊं फार दुःखमय काय ?...बाम......" तो विचारीत होता.

" मामांना भेटून...आईलाहि...दोघें बरोबरच..." तिचे शब्द आले.

" हो हो !...आपण त्या दोनहि फोटोंचं लग्न आधीं लावूं आणि मग आपलं दोघांचं...हः हः हः !" हें हास्य मोहनचें होतें. तीं उठून परत येऊं लागलीं.

"...ती लग्नपत्रिका मी मुद्दाम कंपोज करायला...तो कंपोज आतां कुसुमच्या व नंतर थोड्याफार फरकानें आमच्या...उपयोगी...हः हः हाः"

"...लग्न आणि प्रेम यांत सर्व चालतं ना ! मग..."

# आडगांवची शाळा !

**आडगांव** हें खरेंखुरेंच आडगांव होतें. तालुक्याच्या अगदीं एका बाजूस असल्यामुळें त्या बाजूला सरकारी अधिकारी फारसे कधीं जात नसत. या आडगांवांत अगदीं आडबाजूस एक शाळा होती. सुताराची, किंवा सोनाराची अथवा गणपतीचीहि नव्हे, मुलांना शिकविण्याची शाळा. मुलांना शिकविण्याची शाळा गांवाच्या कुठल्याहि कोपऱ्यास, कितीहि गैरसोयीच्या ठिकाणीं असली तरी चालते ! परंतु बाकीच्या शाळा धंदेवाईक-पणाच्या असल्यामुळें शाळा घालणारांच्या दृष्टीनें त्या गांवांत मध्यवस्तीच्या ठिकाणींच असाव्यात अशी शक्य तों काळजी घेण्यांत येत असते.

आडगांवची ही शाळा म्हणजे चोहों बाजूंस चार भिंती, साधारण पडक्या स्थितींतच असलेल्या व दोन दरवाजे. खिडक्या फारशा नाहींतच ! वरच्या छपराला कोळिष्टकांचें छत होतें. खिडक्यांवर त्याच जातीच्या झालरी होत्या. शाळेंत एका भिंतीच्या मधोमध एक टेबल, हो टेबलच; कारण त्याला लाकडाचा पाट आणि तो उचलून धरावयास लाकडाचे चार खूर होते. टेबलाचा पृष्ठभाग ट्रेनिंग कॉलेजच्या एखाद्या शिक्षकाच्या दृष्टीस पडला असता, तर तें टेबल आडगांवच्या शाळेंत राहिलें नसतें. कारण पर्वत आणि दऱ्या यांच्यामुळें पृथ्वीचा पृष्ठभाग कशा प्रकारचा असतो हें 'प्रॅक्टिसिंग स्कूलमधील वर्गास प्रत्यक्ष दाखवावयास तें टेबल उपयोगी पडलें असतें'!

खुर्ची ! हो खुर्चीच म्हणावें आपण तिला. पाठीची एक पट्टी सुटली होती. एक खूर पेंचकटला होता. भिंतीला मागें रेलावयाची मास्तरना संवय असल्यामुळें, खुराखालीं खळगे व भिंतीला खांच पडून असा देखावा दिसे, कीं तो पाहून एखाद्यास भिंतींतील अदृश्य खुंटास चतुष्पाद जनावर त्या ठिकाणीं बांधून ठेवण्यांत येत असावें असा भास झाला असता!

या शाळेचे पंतोजी प्रौढ वयाचे होते. ते शाळेंत यावयाच्यापूर्वी शाळेची स्थिति आगबोट आंत आल्यावर दिसणारा बंदराचा देखावा दाखवीत

असे; तर ते शाळेंत आल्यानंतर कसाई आपल्या कसाईखान्यांत आल्यावर मुक्या प्राण्यांच्या देखाव्याची आठवण करून देत असे! एका बाजूला डोंगराची उंच चढण, तर दुसऱ्या बाजूला खोल उतरण" होती! आजू-बाजूला रानटी कांटेरी झाडें आणि घाणेरी माजली होती.

सकाळचा साडेआठ–नऊ वाजण्याचा सुमार झाला होता. शाळेंत तीन इयत्ता होत्या. त्या तीन इयत्तांतील मिळून तेरा मुलें ‘ हैदोसदुल्ला ’चा खेळ खेळण्यांत गुंतलीं होतीं! पहिल्या इयत्तेच्या मुलांची वयवारी आठपासून अठरा वर्षांपर्यंतची होती. साडेआठ-नऊ वाजण्याच्या सुमारास खुणेचा शब्द झाला! शाळेंत जिकडे तिकडे सामसूम झालें!

हिंदुस्थानांत जेव्हां राज्यव्यवस्था नीट नव्हती, तेव्हां गांवावर लुटारूंचे दरोडे पडत असत. त्या दरोडेखोरांस टेहळण्याकरितां गांवाबाहेर एक उंच टेहळणीची जागा केलेली असे. टेहेळक्यानें इशारत दिली, कीं गांवकरी येणाऱ्या संकटास तोंड देण्याची आगाऊ तजवीज करावयास लागत असत. तशीच व्यवस्था या शाळेंतील मुलांनीं केलेली होती. पंतोजी येत असल्याची ती इशारत होती. इशारत ऐकून मुलें सावध झालीं. बंदराचें रूपान्तर कसाईखान्याच्या मंडपांत झालें!

पंतोजी खांकरले! मुलांच्या हृदयानें ठाव सोडला! पंतोजींचीं पावलें ऐकूं येऊं लागलीं! मुलांच्या तंगड्या कांपूं लागल्या! पंतोजींचें डोकें दिसूं लागलें! मुलांच्या मुंड्या खालीं वाकल्या! पंतोजींनीं शालागृहांत प्रवेश केला! मुलांचीं मनें अंतरालांत प्रवेश करून तरंगूं लागलीं! आतां खेळ संपला. आतां अभ्यास सुरू व्हावयाचा!

पंतोजी खुर्चीवर बसले! मुलेंहि आपापल्या जागेवर बसलीं! आतां कुठल्या वर्गाची साडेसाती सुरू होते?

“ पहिली इयत्ता! ” मास्तर गरजले.

पहिल्या इयत्तेंतील मुलांचे धाबे दणाणले. पंतोजींच्या टेबलावर छडीचा आवाज झाला आणि त्या आवाजाबरोबर मास्तरांचे शब्द सर्वांना स्पष्ट ऐकूं आले.

“आपापलीं वाचनपुस्तकं घेऊन उभे राहा आणि इकडे टेबलाभोंवतीं या.”

मास्तरनीं विकत घेतल्या वेळच्या रंगाची दाद लागूं न देणारा डोकीचा

रुमाल काढून टेबलावर ठेवला आणि दोन्ही पाय टेबलावर सोडून ते मागें रेलूं लागले.

"काढा धडा तिसरा. वाचा, आमची शाळा."

मुलें एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागलीं! पहिला धडा शिकवून झाला होता! तो धडा दोन महिने चालला होता! कारण कांहीं आठवडे मुलें गैरहजर होतीं आणि कांहीं आठवडे पंतोजी गैरहजर होते! आतां दुसरा धडा घ्यावयाच्या आधीं तिसरा कां काढला? मुलांना शंका आली. पण कोणीच बोलला नाहीं.

"वाचा, पहिल्या नंबरापासून वाचा."

"पण पहिला नंबर कोणाचा? गेले चार महिने नंबर लावलेच नाहींत, मास्तर." एक मुलगा म्हणाला.

"चूप! जास्त वटवट नको. आतां तुम्ही ज्या रांगेनं उभे राहिलां आहांत, त्याच रांगेनं नंबर मोजायचे. तुमच्या उजवीकडून पाहिला. वाच रे शंखा!" मास्तरनीं सांगितलें.

शंकरनें वाचण्यास सुरुवात केली, "बने, ही पाहा आमची शाळा!..."

"थांब रे शंखा! काय सांगतों तें आधीं ऐकून घे नीट. एकेक वाक्य वाचून झालं, कीं कांहीं शंका असल्यास मला विचार; समजलं ना?" समजलं शब्दांतील 'स' अक्षराच्या उच्चाराबरोबर टेबलावर छडी कडाडली!

मुलांना पुन्हा आश्चर्य वाटलें. कारण शंका विचारली, कीं पंतोजींस कोण संताप चढावयाचा! आणि आज हें असें कसें?

पंतोजी तालुक्याच्या गांवीं गेल्या वेळीं त्यांना त्यांच्या ओळखीचा एक ट्रेंड शिक्षक भेटला. त्याच्याकडून त्यांना अशी एक नवलाची वार्ता समजली, कीं ट्रेंड शिक्षक मुलांना शंका विचारावयास परवानगी देतात; नव्हे, शंका विचारावयास भागच पाडतात. मग आडगांवच्या शिक्षकांनींहि मनात आणलें, कीं आपणहि मुलांना शंका विचारायास परवानगी द्यावी!

कोणत्याहि मुलाला सरळ नांवानें हांक मारावयाची त्यांस संवयच नव्हती. म्हणूनच ते शंकरला म्हणाले,

"शंखा! वाच आणि मग शंका विचार, अं?"

शंकर वाचूं लागला, "ही शाळेची बाग. येथें किती तरी फुलझाडें

लाविलीं आहेत ! त्यांना आम्हीच पाळीपाळीनें पाणी घालितों. ”

“ पुरे ! आतां शंका विचार. ”

“ मास्तर, बाग म्हणजे काय ? ” शंकरनें शंका विचारली.

“ शंखच आहेस ! अशी का शंका विचारतात ? अवघड शब्द विचारावेत. बाग म्हणजे बगीचा. ”

“ पण बगीचा म्हणजे का... ”

“ चूप बस; बोलूं नको ! ” पंतोजी गुरगुरले.

“ बरं, फुलझाडं म्हणजे तरी ? ”

“ धर ! घे ! ” पंतोजींनीं शंकरला दोन छड्या दिल्या. “ तूं वाच रे [illegible] आतां ! ” पंतोजींनीं खालच्या मुलास हुकूम सोडला.

सदाशिव वाचूं लागला,

“ ती बघ पलीकडे खेळण्याची जागा ! तेथें आज आम्ही चेंडू खेळणार आहों. आम्ही कवाईतहि तेथेंच करितों. ”

“ अरे, शंका विचार ना ! ”

शंका विचारल्याचा परिणाम काय होतो तें नुकतेंच सर्वांच्या निदर्शनास आलें होतें. तथापि शंका न विचारली तरी परिणाम तोच व्हावयाचा हें ठरलेलें असल्यामुळें शंका विचारणें प्राप्त होतें.

“ मास्तर, शाळेकडे खेळण्याची जागा असते का हो ? ” सदूनें शंका विचारली.

मास्तरना पंचाईत पडली. होय म्हटलें, तर मुलांस खेळास परवानगी दिल्यासारखेंच झालें. नाहीं म्हणावें, तर पुस्तकांत तसें छापलेंच आहे, त्याची वाट काय ? शेवटीं पंतोजी आपल्या मूळ वळणार जाऊन म्हणाले,

“ अरे शंका म्हणजे शब्दांचे अर्थ विचार लेका, नुसते ! ”

“ तर मग कवाईत म्हणजे काय ? आणि ती कवाईत कशी करतात ? ” सदूनें पुन्हा विचारलें.

शंकांचीं पिलें सारखीं वाढत चाललेलीं पाहून पंतोजींना चुकल्याचुकल्या-सारखें वाटूं लागलें. मुलांच्या शंका या जन्मीं संपण्याचा संभव नाहीं, याबद्दल पंतोजींची खात्री झाली.

शाळेकडे बाग, फुलझाडें, मुलांनीं पाणी घालणें, चेंडूनें खेळणें, कवाईत

करणें या सर्व गोष्टी शाळा या शब्दाबरोबर उच्चारणें म्हणजे कांहीं तरी घोटाळा आहे असें मुलांना वाटत होतें.

" मूर्खा, पुरे तुझी बडबड. तोंड आटप. गोंद्या, तूं वाच रे पुढं." पंतोजी तिसऱ्या नंबरास उद्देशून म्हणाले.

" बने, आंत ये. हें टेबल आणि ही खुर्ची पाहा. येथें आमचे मास्तर बसतात. ते फारच मायाळू आहेत." गोविंदानें वाचलें.

" पुरे! आतां शंका विचार."

" टेबल आणि खुर्ची या दोहोंवर मिळून मास्तर बसतात, असाच ना मास्तर, अर्थ?"

" अरे अडाण्या, दोहोंवर कसे बसतील? खुर्ची बसण्याकरितां [illegible] टेबल लिहिण्याकरितां असतं." पंतोजी रागावून म्हणाले.

" पण दोहोंवर तुम्ही आतां बसलांतच आहांत!"

" फाजील बोलतोस का?" पंतोजींनीं चिडून विचारलें. ते छडी सरसावून खुर्चीवरून उठले आणि गोविंदाजवळ येऊन उभे राहिले.

" आणखी नाहीं कांहीं विचारायचं?"

" मास्तर, मायाळू म्हणजे काय?" गोविंदानें विचारलें.

" घे, एक-दोन-तीन, घे." पंतोजींनीं छड्यांचा मारा सुरू केला. नंतर ते म्हणाले, " लेका, तुला मायाळू म्हणजे काय तें अजून समजत नाहीं? इतका सोपा शब्द कळत नाहीं?" गोविंदा रडकुंडीस आला.

" मायाळू म्हणजे दयाळू. मास्तर दयाळू असतात!" पंतोजी समजावून देऊं लागले. नंतर त्यांनीं प्रत्येक मुलाला झोडपण्यास सुरुवात केली. मग ते विचारूं लागले.

" मायाळू म्हणजे काय?"

" दयाळू."

" कोण मायाळू?"

" मास्तर मायाळू."

" बरोबर. आतां तूं वाच रे हऱ्या."

हरि वाचूं लागला,

" भाऊ, भिंतीवर हें काय टांगलं आहे बरं?"

" तुझं डोंबलं टांगलं आहे गद्धया !" मास्तर संतापातिशयानें म्हणाले, " अरे अडाण्या ! नीट वाच ना ! हं, आटप, शंका..."

" मास्तर, नकाशे म्हणजे काय ? "

तोंपर्यंत दुसरा एक मुलगा वाचन झाल्यावर विचारूं लागला.

" शाळेला एकावर एक तीन ओटे कसे असतील ? "

" कार्ट्यांनो, तुम्हांला शंका विचारायला परवानगी दिली त्याचा परिणाम हा वाटतं ! तोंडांतून ब्र काढूं नका. शंकाबिंका कुछ् नाहीं. यापुढं तुम्हीं बिलकूल शंका विचारतां कामा नये. ट्रेनिंग कॉलेज म्हणजे पागल-खाना आहे. त्यांतले मास्तर म्हणजे मूर्खशिरोमणी आहेत ! ह्या धड्यांतली माहिती बरोबर छापलेली नाहीं ! सगळयाच चुका, आणि पुस्तकाला शुद्धिपत्रदेखील नाहीं ! तुम्ही पोरांनो, तर अगदींच अवलक्षण आहांत ! उद्यां पासून वाचन वाचा, पण शंका विचारूं नका. चला तोंडं घेऊन तिकडे. काळतोंड्यांनो...! "

# तयारी

" कर जोडुनि नमन करूं तुज गजानना..."

सुरुवातीची प्रार्थना झाली. नंतर एकदम शांतता पसरली. सर्व मुलें ठेवणीचा पोषाख करून आलीं होतीं. आणि आज तीं रोजच्या सारखी फार गडबड करीत नव्हतीं. तशी त्यांना सूचना होती.

आमच्या गांवची शाळा देवळांतच बसत असे. मी मॅट्रिक्युलेशन परीक्षा पास झाल्यानंतर एक वर्ष घरींच राहिलों होतों. त्यामुळें कधीं कधीं रिकाम्या वेळीं देवळांत जाऊन बसत असें. देवळांतल्या शाळेचा कारभार मला करमणुकीचा विषय वाटे. कोणा मुलास कसलीही मदत लागली तर ती करावयास माझी तयारी असे. मुलासच काय, वेळीं शिक्षकासही जरूर ती मदत मी करीत असें. निरीक्षणाशिवाय मी दुसरें कांहींच करीत नसल्यामुळें माझ्या निरुपद्रवीपणाची शिक्षकासही खात्री पटलेली होती. त्या दिवशीं शिक्षकानेंहि आपल्या पोषाखाच्या ठाकठीकपणाकडे लक्ष पुरविलें होतें. वार्षिक तपासणीची तयारी चालली होती.

त्या शाळेची वार्षिक तपासणी आज व्हावयाची होती. शिक्षक सर्व वर्गावरून नजर फिरवीत होते. त्यांचा चेहरा एकदम पालटलेला मला दिसला. एका विवक्षित मुलाकडे पाहून त्यांनीं भुवया वक्र केल्या. त्यांना संताप आल्यासारखा दिसला.

" सद्या ! गद्धया, अरे तूं कशाला आलास आज, अं ? "

" मला घरच्या माणसांनीं जायला सांगितलं, आज परीक्षा आहे म्हणून."

" अरे, पण तुला निरोप नाहीं का कळला ? " टेबलावर हात आपटीत शिक्षकानीं विचारलें.

" सगळ्यांनीं चांगले कपडे करून शाळेंत लवकर आलें पाहिजे असा निरोप होता..."

"मूर्खा !..."शिक्षक फारच संतापले."सगळ्यांनीं म्हणजे काय, त्यांतही निवड

आहेच." घाणेरडा सदरा घालून सदू शाळेला आला होता, तो दचकला. त्याचें सर्वांग नेहमींप्रमाणें ओंगळच होतें. शिक्षकांचें सर्वांग रागानें थरथरा कांपत होतें. त्यांनीं पुन्हा वर्गाकडे पाहिलें. "अरे! मधू आला नाहीं अद्याप!" असें आश्चर्यानें ते आपल्याशींच पुटपुटले. किंचित्काळ ते कपाळावर हात घेऊन विचार करीत बसले. "तयारी चोख पाहिजे." ते म्हणाले. शाळेंत आलेल्या विद्यार्थ्याला शिक्षक असें कां उलट विचारतात, याचा मला तर उलगडाच होईना. मी आश्चर्यचकित झालों. लहान लहान मुलें बावरून गेलीं होतीं. कांहीं मुलें मास्तरची नजर चुकवून देवाकडे तोंड करून भीत भीत, हात लपवीत, गालाला स्पर्श करीत देवाला नमस्कार करीत होतीं. परीक्षेच्या तोंडातून, कीं शिक्षकाच्या हातांतून सुटण्याकरितां तें त्यांच्याच मनाला माहीत! त्या वातावरणांतला मूळचा गंभीरपणा आतां भीतीचें रूप धारण करूं लागला.

शिक्षक जागेवरून उठले. या बाजूकडून त्या बाजूकडे त्यांनीं एक खेप मारली. दूरवर नजर फेंकली. भोंवतालीं झाडीच होती. आपल्या खुर्चीजवळ येऊन त्यांनीं कर्कश स्वरांत पुढील हुकूम सोडला.

"सद्या! धावत जा आधीं मधूच्या घरीं. त्याला आतांच्या आतां शाळेंत पाठवून दे आणि तूं राहा कुठें तरी बाहेरच्या बाहेर."

सदू धावतच निघावयाचा, पण शिक्षकानें तितक्यांत माझ्याकडे पाहिलें व त्यामुळें वरील वाक्यांतील शेवटले शब्द उच्चारतांना त्यांनीं जीभ चावली; म्हणून ते शब्द अस्पष्ट उमटले. सदू मास्तरांच्या तोंडाकडे पाहात आज्ञेचा स्पष्टपणा ऐकण्याकरितां उभा राहिला. मला मात्र त्या आज्ञेचें नवल वाटलें.

मधूचें घर जवळच होतें. मधूचीं वडील माणसें माझ्या परिचयाचीं होतीं. मधूला बोलावण्याचें काम मला करतां येण्यासारखें होतें.

"मी आणतों आतां मधूला, मास्तर!" असें म्हणून मी लगेच निघालों. जातां जातां मीं म्हटलें, "सदूला कशाला या वेळीं त्रास उगाच?"

जातांना मीं मागें सहज वळून पाहिलें, तों मास्तरांनीं केलेले हातवारे विलक्षण दिसले. 'फसलें सारेंच' अशा अर्थाचे ते निराशेचे हातवारे होते. वास्तविक माझ्या या स्वयंसेवकत्वामुळें त्यांना आनंद व्हावयास पाहिजे होता.

"अहो बसा तुम्ही! तुम्ही कशाला त्रास घेतां उगाच," असें ते मला

ओरडून सांगत होते. पण अशा अडचणीच्या वेळीं त्यांना मदत करणें हें मला माझें कर्तव्य वाटत होतें. मी दृष्टीआड होतां होतां पुन्हा एकदां मागें वळून पाहिलें. तों शिक्षकांच्या आज्ञेवरून सदू बाहेर जात असलेला मला दिसला.

मी मधूच्या घराजवळ येतों, तों मधू घाईनें शाळेला येण्याकरितां घराबाहेर पडणार याची मला खात्री पटली. कारण त्याच वेळीं पुढील भाषण माझ्या कानांवर आलें—

" जा लवकर, पळ ! उशीर झाला. अजागळ कुठला; पहिला नंबर आला पाहिजे परीक्षेंत, नाहीं तर तुला कांहीं एक मिळणार नाहीं. जेवायला देखील वाढणार नाहीं..." हे शब्द बहुधा मधूच्या आईचे असावेत.

" अरे अजून गेलास नाहीं का ? काय पण तोंड परीक्षा देणाऱ्याचं. वर्षभर शिकव शिकव शिकवला तें फुकट घालवणार वाटतं; या वेळीं काय प्राण चालला होता घरांत रेंगाळायला ? देऊं का एक रपाटा पाठींत ? पहिला नंबर नाहीं आला तर यादच राख......" हे शब्द खास त्याच्या वडिलांचे होते. मी तिथूनच मागें परतलों. मधू रडकुंड्या तोंडानें धावत सुटला होता. शाळेंतल्या शिक्षणाबाहेर मधूला घरीं त्याची आई आणि वडील शिकवीत व वरच्या इयत्तेचा अभ्यास करून घेण्याचा जुलूम रात्रंदिवस करीत असत. लहान वयांत फार शिकवून एक नवलाचा नमुना जगास दाखवावा असा त्याचा निश्चय होता. मधूचें वय आठ वर्षांचें असून, त्याचें नांव दुसरींत होतें. घरीं विषय तिसरीचे शिकविले जात असत.

मधूला शाळेकडे धावतांना पाहून मी, गुराखी गुरें हाकीत चालले होते तिकडे वळलों. कारण त्यांत कांहीं शाळेचीं मुलें असल्याची माझी खात्री होती आणि शिक्षकास मदत करणें हें तर माझें पवित्र कर्तव्य होतें. मला त्यांच्या तयारीला हातभार लावावयाचा होता.

माझ्या साध्या सरळ मनाला वाटत होतें, एकाही असहाय शिक्षकाला कोणाचीच मदत मिळूं नये का ? किती कठीण शिक्षकाची स्थिति आहे ही ! गुराख्यांमधील तीन विद्यार्थी मीं शोधून काढले, त्यांचीं गुरें दुसऱ्या गुराख्यांच्या हवालीं करून मीं त्यांना मोकळें केलें आणि लवकर शाळेंत जावयास सांगितलें. शिक्षकांस मदत केल्याबद्दल मला धन्यता वाटली.

शिक्षक माझे आभार मानणार याची मला खात्रीच होती. पण न सांगतां उपकार करण्याची ही मला संधि मिळाली म्हणून मला सात्त्विक आनंद झाला होता. तीं मुलें मात्र आश्चर्य पावून आपसांत कुजबुजत चाललीं होतीं. आपणांला शिक्षकांनीं बोलावलें कसें ? पूर्वीच्या सूचनेला उलट अशी ही दुसरी सूचना कशी बरें आली ? ही गोष्टच अशक्य आहे, असें त्यांचे चेहरे दर्शवीत होते.

एवढी कामगिरी आटोपून मी देवळांत आलों आणि आंतल्या बाजूस बसलों. शिक्षक सर्व वर्गांची हजिरी लावीत होते.

सर्वांचें लक्ष बाहेर लागलें होतें. तपासणीस सुरुवात केव्हां होईल याचा नेम नव्हता. शिक्षकांनीं हजिरी घेतली, त्यावरून दुसरींत सदू आणि मधू हीं दोनच मुलें होतीं असें दिसलें. सदू सरासरी अकरा वर्षांचा असून तो शाळेंत नियमित येत नसावा. त्यांची तयारी पहिल्या इयत्तेइतकीही नव्हती. मधू वर्गांत येऊन पोचला, तेव्हां मास्तरना किंचित् बरें वाटलें. मधू मात्र भेदरून गेला होता.

तिसरींतलीं तीन मुलें कमी होतीं असें दिसलें. वर्गांत मुलें पांच असून हजर फक्त दोनच होतीं. आजदेखील मुलांना हजर ठेवावयास पालक दक्ष नाहींत याचा मला राग आला. माझ्याकडून शक्य ती मदत मी करून करीत होतों. गुरांकडे गेलेल्या मुलांना परतविलें, पण शिक्षक मात्र माझ्याकडे कृतज्ञतेनें कां पाहात नसावे बरें ? त्यांची मुद्रा अतिशय त्रासिक दिसली. माझी अपेक्षा खोटी ठरली. माझ्याविषयीं कांहींसा तिरस्कार त्यांच्या मनांत अंकुरत असलेला त्यांच्या चेहऱ्यावर उमटत होता. मला चमत्कारिक वाटलें तें सारें. या प्रसंगामुळें मास्तरांचें मन ताळ्यावर नाहीं अशी मीं माझ्या मनाची समजूत घातली.

साडेनऊ वाजून गेले. पावणे दहा झाले. अद्याप 'इनिस्पेक्टर' आले कसे नाहींत ? सर्वांचे डोळे त्यांच्या वाटेकडे लागले होते.

मास्तरनीं दप्तर, टेबल, पेटी वगैरेची उघडझांक करण्याचें सारखें चालू ठेवलें होतें. त्यांची तयारी चालू होती. वस्तु ठेवावयाच्या कोणत्या व टाकावयाच्या कोणत्या याचा विचार ते करीत असावेत. सकाळींच आल्या-बरोबर त्यांनीं मुलांना बडवावयाची छडी छपरावर फेंकून दिल्याचें मला दिसलें

होतें. शाळेच्या सामानाच्या क्षीरीमधून पाणी वेगळें काढून टाकण्याचा हंसपणा या क्षणीं त्यांच्या आंगीं संचरला होता. टेबलांतल्या कांहीं वस्तु काढून मला कळणार नाहींत अशा गुपचूपपणें त्यांनीं मोठ्या पेटींत टाकून दिल्या.

इतक्यांत एक मुलगा घाईघाईनें देवळांत शिरला आणि त्यानें दोन कागद दुमडलेले शिक्षकाच्या हातीं दिले. दोहोंतला आधीं कुठला उघडावा याचा त्यांनीं क्षणभर विचार केला आणि एकच घडी घातलेला कागद प्रथम उघडला. मधून मधून ते त्या मुलाबरोबर बोलतही होते. चिठीसारखा दुमडलेला कागद तेथेंच राहिला. त्या पहिल्या कागदांत परीक्षेंत विचारावयाचें प्रश्न होते. कारण ते प्रश्न त्यांनीं लगेच एकेका वर्गास समजावून सांगण्याचा उद्योग आरंभिला.

एकंदर प्रकारावरून माझ्या लक्षांत आलें, कीं काल संध्याकाळीं शेजारच्या गांवांतील परीक्षा आटोपल्याबरोबर तेथील परीक्षेंतले प्रश्न शिक्षकानें या मुलाबरोबर पाठवून दिले होते.

परीक्षकांस मींही कधीं पाहिलें नव्हतें. पण ' इनिस्पेक्टर ' दिसतांच या मुलानें देवळांत शिरून निघून जावयाचें ठरविलें होतें.

देवळाभोंवतालच्या गर्द झाडींतून एक शिपाई येताना दिसला. तो शिपाई सर्व शिक्षकांच्या आणि वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांच्या पाहाण्यांतला होता. आतां परीक्षण सुरू होणार हें सर्वांनीं ओळखलें. इतक्यांत सदू येऊन वर्गांत आपल्या जागेवर बसला.

शिक्षकांचे ओठ हालले, पण ते त्यांनीं जोरानें चावले व त्याचबरोबर फुटूं पाहाणारे शब्दही गिळले. सदूची उंची मधूहून अर्धा पाऊण फूट अधिक होती. सदूच्या येण्यानें घात झाला असें शिक्षकांस वाटलें असावें.

देवळाच्या दिंडी दरवाजाच्या बाजूस पाय धुतल्यानंतर चूळ भरून टाकल्याचा आवाज माझ्या कानीं आला. त्या बाजूस एक झरा वाहात होता.

आलेल्या शिपायाच्या एका हातांत हॅट व दुसऱ्या हातांत बूट आणि पायमोजे दिसत होते. शिपायाला पाहिल्याबरोबर दुसऱ्या गांवांहून नुकताच आलेला विद्यार्थी संकेताप्रमाणें देवळांत घुसला.

इतक्यांत देवळाची घंटा वाजली आणि साहेबी प्रवासी पोशाख केलेली एक व्यक्ति देवास नमस्कार करून उठली. मी त्या व्यक्तीकडे पाहातों, तों

देवळांत घुसलेला मुलगा पुन्हा बाहेर आला आणि मिळेल त्या वर्गात जाऊन बसला. हा प्रकार घडत आहे, तोंच तिसऱ्या इयत्तेंत मी गुरांकडून परतून आणिलेलीं तीन मुलें येऊन दाखल झालीं. त्यांना पाहून शिक्षकांचा चेहरा खाडकन् उतरला. त्यांनीं माझ्याकडे पाहून दीर्घश्वास टाकला! इतक्यांत दिंडी दरवाजांतून देवदर्शनाकरितां आलेली व्यक्ति बाहेर पडून टेबलाजवळच्या खुर्चीवर बसली आणि परीक्षेस सुरुवात झाली!

हजिरीबुक, कागद व पेन्सिल इतकें साहित्य घेऊन परीक्षक परीक्षा घेत होते. पहिल्यांदा दुसरी इयत्ताच निवडण्यांत आली परीक्षेकरितां. वेळ अर्धा तासच उरल्यामुळें तो लहानसा वर्ग प्रथम हातावेगळा करण्याकरितां घेतला असावा. प्रश्न नवीनच घालण्यांत आले होते.

सदूच्या डोक्यांत अख्ख्या वर्षांत अभ्यासाचें एकही अक्षर न उतरल्यामुळें तें अगदीं मोकळें-हलकें म्हणजें रिकामें होतें; तर उलटपक्षीं शाळेंत शिक्षकाची आणि घरांत आईबापांची अशी तिप्पट शिकवणी शिकून भरल्यामुळें व शिवाय भयंकर धमक्यांमुळें मधूचें डोकें जड आणि बथ्थड झालें होतें. त्यामुळें विचारलेल्या प्रश्नांस एकाकडूनहि उत्तर मिळत नव्हतें. हजिरीपटांत या वर्गात दोनच मुलगे असतांना तिसरा एकाएकीं कुठून उमटला हें गूढ उकलण्यांत परीक्षक गढले होते. हा तिसरा मुलगा च्च्च्च-प्प्प्प-म्मम्म करीत राहिला होता. शिक्षकांचें सर्वांग थरथरत होतें.

"दुसरींत हा तिसरा मुलगा कुठला, मास्तर?" प्रश्न विचारला गेला.

"तो कालच नवीन आला आहे, नांव नाहीं घातलं अजून!" उत्तर आलें.

"अस्सं का! नांव काय रे मुला तुझं?"

"सदाशिव गोपाळ कुळकर्णी"

"काल तूं शेजारच्या शाळेंत पास झाला आहेस ना तिसऱ्या इयत्तेंत?"

मुलगा गप्प!

"आज या शाळेंत दुसरींत बसायला आलास का?"

उत्तर नाहीं.

परीक्षकांनीं घड्याळ्यांत पाहिलें आणि तिसरीची परीक्षा सुरू केली. या मुलांना शाळेंत येतांना परीक्षकांनीं पाहिलेंच होतें. त्यांना उशिरां येण्याचें

कारण विचारतां शिक्षकांकडून मिळालेल्या पूर्वीच्या सूचना व मी मुद्दाम त्यांना शाळेंत बोलावून कसें आणलें हा सर्व प्रकार बाहेर पडला. मला कसेंसेंच झालें. परीक्षकांनीं माझ्याकडे पाहिलें. मी त्यांना नमस्कार केला. शिक्षक तयारी कशी करीत होते तें मला आतां उलगडलें. मी करीत असलेले उपकार त्यांना अपकारासारखे वाटत होते.

तिसरीचा लेखन विषय सुरू असतां टेबलावर उघडावयाची राहिलेली कागदाची घडी उघडून परीक्षक मोठ्यानें वाचूं लागले. त्यांतील सर्व मजकूर आतां माझ्या लक्षांत नाहीं, पण पुढील वाक्य असावेंसें आठवतें. "...चालू सालीं साहेब बहुधा प्रत्येक शाळेचें सामान रजिस्टर तरजुमा घेऊन पाहातात व टेबल, सामानाची पेटी वगैरे स्वतः उघडून पाहातात. तरी सावध राहावें......"

परीक्षक उठले व त्यांनीं मोठी पेटी उघडली. विडी, आगपेटी व इतर बऱ्याच वस्तु त्यांत टाकलेल्या त्यांना दिसल्या. त्यांनीं त्या बाहेर काढलेल्या मींहि पाहिल्या.

परीक्षा आटोपली व ते जाऊं लागले. तेव्हां पायरी उतरताना छपरावरून एक कावळा उडून गेला आणि त्याच्या पायाच्या धक्क्यानें अर्धी लोंबकळत राहिलेली छडी शिपायाच्या मस्तकावर पडली. वर पाहात परीक्षकांनीं ती आपल्या हातांत घेतली आणि शिक्षकांच्या हातांत देतांना म्हटलें,

" अहो ! ही स्त्रीजात फार उतावळी बरं ! टेबलांतून काढून तुम्हीं तिला छपरावर टाकली ! पण पुन्हा टेबलांत शिरायचा आतांच वेळ झाला असं हिला वाटलं ! फारच उतावळी नाहीं का ही ? "

"...मम–ला गेले चार महिने सारखा म-म–मलेरि–या-या...मुलांना... म-म-मलेरिया ताप येतो–तो–तो..."

मी चित्रासारखा तटस्थ झालों होतों.

# सौंदर्य-सिंधु

**तिच्याकडे** कितीहि पाहिलें, तरी त्याच्या डोळ्यांचें आणि मनाचें समाधान म्हणून होत नसे. ती सात वर्षांची आणि तो दहा वर्षांचा असल्यापासूनचीं तीं दोघें खेळगडी. वाढत्या वयाबरोबर त्यांची मैत्रीहि वाढली. पण ती म्हणजे नुसती चंद्रिका! आपल्याकडे पाहून चकोर कां नाचतात हें चंद्रिकेला कुठें कळतें आहे? प्रकाशून आनंदित करावें एवढेंच तिला ठाऊक! आपल्याकडे पाहून लोकांचें चित्त लोभावतें, याची जाईच्या विकसित कळीला का जाणीव असते?

सिंधूची स्थिति तशीच होती. अगदीं चार वर्षांच्या वयापासूनच तिच्यावर जगाची नजर लोभावली. पहिल्यांदा एका मुलांच्या मासिकांत तिचा बाळपणचा फोटो प्रसिद्ध झाला. एका मार्मिक कलावंतानें तें छायाचित्र पाहून ती सात-आठ वर्षांची झाल्यावर कशी दिसेल याचें केवळ कल्पनेनेंच मानसचित्र काढलें. तेंहि प्रसिद्ध झालें. त्यानंतर त्यानें त्या मुलीच्या चौकशीस सुरुवात केली. त्याला आपली कला प्रत्यक्षाशीं ताडून पाहायची होती ना? त्याला सिंधूचा पत्ता लागला. अतिशय आनंदित झाला तो. पण जेव्हा त्याची दृष्टि त्या दिव्य, लावण्यवती बालिकेवर पडली त्या वेळीं तो खजील झाला!

त्याचें मानसचित्र! त्याला आपल्या कलेची लाज वाटली. त्याचें मानसचित्र पाहून त्याच्या मार्मिक व रसिक मित्रांनीं त्याची पाठ थोपटली होती. स्वतःच्या कलाकृतीची त्यालाहि धन्यता वाटे; पण त्या मुलीला प्रत्यक्ष पाहिल्यावर त्यानें तिथल्या तिथेंच तिची मूर्ति रेखाटली आणि पहिलें मानसचित्र फाडून टाकलें.

तोंपर्यंत अनेक मासिकांत तिचे फोटो प्रसिद्ध होऊं लागले. त्या लोकां-कडून जें काय मिळे, तेवढ्यावरच तिचा व तिच्या आईबापांचा चरितार्थ चाले. अनेक फोटोग्राफर, चित्रकार, शिल्पकार, कलावंत तिच्या पोझेस

घेण्यासाठीं येत. तिला त्यांच्याकरितां ते सांगतील तसें बसावें, उठावें लागे. लहान वयापासूनच तिच्यावर हा ताण पडल्यामुळें तिला तसल्या जीवनाचा कंटाळा येऊं लागला. तिची मर्जी सांभाळावयास रोज रोज येणाऱ्या कलावंतांचा ती मनांतून तिरस्कार करूं लागली.

पण या तिच्या वर्तनाचा त्याला–बिंदुमाधवाला अचंबा वाटूं लागला. तो तिचा बालमित्र. सिंधूचा हा वाढता लौकिक पाहून त्याला पराकाष्ठेचा आनंद होई. "आपल्यासारख्याकडे कोणी ढुंकूनदेखील पाहात नाहीं, पण सिंधूच्या नखदर्शनालादेखील लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटतात! काय हा सौंदर्याचा प्रभाव!"

कपड्यांच्या, औषधांच्या, टॉयलेटच्या, सुवासिक तेलांच्या हरएक जिनसांच्या जाहिरातीसाठीं तिच्या एकेका अवयवाच्या असंख्य पोझेस घेतल्या जात. हें सर्व पाहून तो आपल्या मनाशींच म्हणे, 'खरोखरच आमचीं नांवं सार्थ आहेत. मी बिंदु आणि ती सिंधु!'

ती वाढत जाऊं लागली, तसतसा तिच्याभोंवतीं कलावंतांचा अधिकच गराडा पडूं लागला. शहरच्या जीवनाचा तिला पुरा पुरा कंटाळा येऊं लागला. त्याला आणि तिला एकत्र बसायला फारच थोडा वेळ मिळे. तो अनिमिष नेत्रांनीं तिच्या सौंदर्याचा दर्शनास्वाद घेई आणि मग तो म्हणे—

"खरंच, तूं किती भाग्यशाली!"

"आणि तूं?"

"मी देखील थोडासा!"

"तो रे कसा?"

"ह्या इतरांपेक्षां मी तुला जवळचा म्हणून!"

"पण मला हें भाग्य नकोच आहे असलं!"

"म्हणजे?"

"ह्यांत भाग्य कसलं आलं आहे रे बिंदु? विनाकारण सारा दिवस त्रास पाठीमागं!"

"हा तुझ्या सौंदर्याचा प्रभाव! ह्यांत तुला धन्यता वाटत नाहीं वाटतं? आणि तूं की नाहीं–"

"हं-हं, बोल! बोल!"

" तूं की नाहीं, मला फार आवडतेस. " तो संकोचला.

" हो का ? कां म्हणून ? सौंदर्यासाठींच ना ? " तिनें अल्लडपणें मोठ्यानें हसून विचारलें.

बिंदूला त्यांत किंचित् उपहासाची छटा दिसली. तरी पण त्यानें म्हटलें, " हं. "

तिच्या चेहऱ्यावर विषण्णता पसरली.

" हें पहा बिंदु, " ती विचारमग्न होऊन म्हणाली, " जें जवळच असतं तें दूरच्याकरितां; जवळच्याकरितां नाहीं, हेंच खरं ! ".

तिचे हे शब्द त्याला एखाद्या ज्ञानजड वेदांत्याच्या व्याख्यानातील उताऱ्यासारखे वाटले. तो तिच्या तोंडाकडे सारखा टकमक बघत राहिला होता. तिच्या चिंतामग्न चेहऱ्यांतहि त्याला सौंदर्य ओतप्रोत दिसत होतें.

अशा चित्राला 'संचित सौंदर्य' असें नांव बरें दिसेल असा विचार त्याच्या मनांत आला होता. पण तिच्या मुखांतून दीर्घ श्वास निघाला होता !

ती पंधरा सोळा वर्षांची बालिका; पण तिचें बोलणें त्याला समजलें नाहीं. तो सौंदर्यमुग्ध झाला होता. तिनें तें ओळखलें.

" सौंदर्य माझ्याजवळ आहे, तें दूरदूरच्या कलावंतांना उपयुक्त वाटतं. मला काय आहे त्याचा उपयोग ? "

" पण मला–? " तो अडखळत, भीत चुकल्यासारखें करीत म्हणाला.

" अं ? हंः हंः " ती पुन्हा हसली.

" तुला ? पण तूं जवळचा कीं दूरचा ? "

अगदीं सरळ होता प्रश्न तिचा; पण उत्तर देववेना त्याच्यानें. तो उगी राहिला. तो प्रेमांतला पेंचप्रसंग होता.

असे कांहीं दिवस गेले. रंगभूमीसाठीं आणि चित्रभूमीसाठीं तिला मागण्या येऊं लागल्या होत्या. एक दिवस सिंधु आणि बिंदु एकत्र बसलीं होतीं. खूप दिवसांनीं त्यांची गांठ पडली होती. बिंदूला सिंधूविषयीं परकेपणा वाटूं लागला होता. चार दिवसांपूर्वी एका तरुणाला त्यानें सिंधूशीं बोलतांना पाहिलें होतें. एक कसला तरी कागद त्या दोघांनीं हातांत धरला आणि तो तीं दोघें वाचीत होतीं. त्यानंतर बराच वेळ तीं एकमेकांशीं बोलत होतीं. तो निघून गेला तरी ती त्याच्याकडे सारखी पाहात राहिली होती. तिच्या नजरेंत

कांहीं निराळ्याच भावना दिसल्या त्याला.

"काय माझ्या जीविताचा उपयोग ?" ती उद्वेगानें म्हणत होती.

"असं कां बरं म्हणतेस सिंधु ?" त्यानें कळवळयानें विचारलें.

"बिंदु, खरं सांग, मी कुणाला तरी आवडते का ?"

"वाः ! काय खुळा प्रश्न हा ! साऱ्या जगाला तूं आवडतेस."

"अहा रे वेड्या ! मी कुठं आवडतें ? माझं सौंदर्य आवडतं. माझ्याकडे कुणीच पाहिलं नाहीं आजवर. माझ्या बाह्यसौंदर्यावरच सारे अडखळून राहिले. देऊळ बघतात, पण गाभाऱ्यांत कोणीच डोकावलं नाहीं. हं–असलंच आहे हें सारं जीवन !..."

बिंदु बिचारा काय म्हणणार यावर ? हिच्या जागीं दुसरी व्यवहारज्ञानी स्त्री असती, तर या वैभवानें ती किती तरी खुलून गेली असती. स्वतः बिंदुदेखील चांगला देखणा आणि छानछोकी तरुण होता. कुणाहि रंगेल वृत्तीच्या तरुणीला तो मोहक दिसला असता.

"बिंदु !" तिनें एकदम हाक मारतांच बिंदूला जरा दचकल्यासारखेंच झालें. ती दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांत गुंतवून लडिवाळपणें स्वतःशींच खेळत होती. सिंधूचें आपल्यावर निरतिशय प्रेम आहे असें लोकांस बिंदु सांगतो, हेंहि तिला अलीकडे कळून आलें होतें.

"बिंदु ! मला तूं सुंदर म्हणतोस ना ?"

आतां कसल्या वेदान्ताच्या डोहांत आपल्याला ही सुंदरी बुडविणार आहे याची कल्पना बिंदूला होईना.

"कशांत आहे माझं सौंदर्य ?" तिनें नुसतें विचारलेंच नव्हे, तर उत्तराच्या अपेक्षेनें ती बिंदूच्या तोंडाकडे रोखून पाहूं लागली.

त्यामुळें बिंदूची किती तरी त्रेधा उडाली. तो तिच्या मुखाकडे पाहील म्हणावें, तर तीच त्याच्या तोंडाकडे टक लावून पाहात होती.

"येतो तो कलावंत माझ्या तोंडाकडेच सारखा बघत राहातो." असें आणखी तिनें वर म्हटलें.

मग बिचारा बिंदु तरी काय करणार ? तो त्या सुकुमार तळहातांच्या चाळ्यांकडेच पाहूं लागला.

सुकुमार फुलाचें सौंदर्य कशांत सांठलेलें असतें ? त्या फुलाच्या पाकळ्या,

देठ, अंतर्भाग, प्रत्येक भाग आपापल्यापरी सुंदरच असतो. त्या सर्वांचा मिलाफ म्हणजे फुलाचें सौंदर्य.

पण या वेळीं त्याची नजर त्या कमनीय करांगुल्यांवर जडल्यामुळें त्याच्या तोंडून शब्द निघाले,

" तळहातांत—"

त्याला म्हणायचें होतें, ' मुखकमलांत ' म्हणून; पण तोच तर तिला दोषसा वाटत होता. तेव्हां तो तसलीच चूक कशी करील ? आपला शब्द आवडला पाहिजे तिला, अशी त्याची इच्छा होती.

त्याचें तें उत्तर ऐकून ती मनसोक्त हसली. त्याची मात्र तारांबळ उडाली. तिच्या अंतःकरणाचा ठाव त्याला लागेनासा झाला.

तो जायला उठला, सिंधूला भेटून गेलेला तो साधारणसाच दिसणारा तरुण कोण असावा याचा त्याला शोध लावायचा होता.

कांहीं अंतर चालून गेल्यावर त्यानें मागें पाहिलें. तो तरुण निघून जाऊं लागल्यावर त्याच्याकडे ती जशी पाहात राहिली होती, तशीच आपल्याकडेहि ती पाहात राहिली आहे कीं नाहीं हें त्याला तोलून पाहावयाचें होतें. पण ती तर उठून घरांत गेली होती !

बिंदु पोस्टमनची वाट पाहात राहिला होता. त्याच्या पत्राचें उत्तर सिंधूकडून त्याला यावयाचें होतें. किती तरी आशेनें तो तिच्याकडून येणाऱ्या टपालाची वाट पाही.

त्याच तरुणाबरोबर ती गेली असावी, अशी त्याची प्रथम कल्पना झाली आणि विशेष चौकशीअंतीं तीं खरी ठरली. तो एक सुप्रसिद्ध कवि होता. तत्त्वप्रधान लेखक म्हणून देखील त्याची बरीच प्रसिद्धी होती. त्याच्याबरोबर ती दूरच्या एका खेडेगांवीं जाऊन राहात होती. तिनें कलावंतांच्या गांठीभेटी घ्यावयाचें बंद केलें होतें. ती अज्ञातवासांत म्हणून राहिली होती. पण बिंदूनें मोठ्या प्रयासांनीं तिचा पत्ता मिळविलाच.

त्यानें तिला पत्र लिहिलें व अगदीं अलीकडचा तिचा फोटो पाठविण्याविषयीं तिला त्यानें फार फार विनविलें. तिची साद्यंत हकीकत समजून घेण्याची उत्सुकता त्यानें आपल्या पत्रांत दर्शविली होती. तिच्या उत्तराची तो रोज वाट पाहात राहिला होता.

शेवटीं एक दिवस पोस्टमन पातळसें एक पार्सल घेऊन आला. त्याची उत्सुकता परमावधीची वाढली होती. त्यानें उघडून पाहिलें. खात्रीनें फोटोच !

“ अरेरे! आपण उगीच लग्न केलं. तिचं आपल्यावर खात्रीनं प्रेम होतं ! ” तो स्वतःशींच पुटपुटत होता. “ आणि काय झालं लग्न केलं म्हणून ? त्यांत काय बिघडलं ? ” तो नवमतवादी बनला होता.

कार्डबोर्ड त्यानें बाजूला काढला. आंत सुंदर फोटो ! सिंधूची पूर्वीची प्रतिमा त्याच्या मनश्चक्षूंसमोर उभी राहिली. तो स्वतःचें देहभान देखील विसरला.

उलटून पाहायच्या पूर्वीच त्यानें त्या फोटोचें चुंबनदेखील घेतलें.

त्याची बायको आडून तो सारा प्रकार पाहात होती. त्याची त्या वेळची एकंदर वृत्ति पाहून तिला आधींच त्याचा संशय आला होता.

“ इश्श ऽ ! काय चाललाय हा प्रकार ? ” असें तिनें म्हणून एकदम झडपही घातली त्या त्याच्या हातांतल्या फोटोवर ! तो रागानें तिच्या हातून तो फोटो हिसकून घेणार तोंच ती दचकून उद्गारली.

“ अगबाई ! हे हात कोणाचे ? ”

एक सुंदर गोजिरवाणें बालक आणि त्याच्या अंगावर त्याच्या आईचे दोन सुंदर हात !

एवढाच तो फोटो होता.

पण त्यांत देखील केवढें सौंदर्य होतें !

त्याला त्यांत एक लहान चिठी आढळली.

“ माझं सौंदर्य तुम्हांला माझ्या हातांत दिसलं होतं ना ? मी म्हणजे माझे हातच ना ? ”

त्या चिठीकडे पाहात बिंदु विचारमग्न झाला. एखाद्या तपस्व्याप्रमाणें जशी कांहीं त्याची समाधीच लागली होती. त्याची बायको हा सारा चमत्कार पाहून दिङ्मूढ झाली होती बिचारी !

# कवितांचें पुडकें

'**माय** उत्तर देणार तिला काय ?
मुखा फिरवी परि नयनिं न उपाय'

"नऊ पाय ?" कोणासा पुटपुटला.

"होय नऊच ! दहा नव्हेत बरें !" दुसऱ्या एकानें उत्तर दिलें. पुन्हा काव्य गायन सुरू झालें.

'मुखा फिरवी परि नयनि न उपाय
रडसि कां गे ?" आईस पुसत लेक

"लेका, बस की खालीं." एक चावट श्रोता हळू म्हणाला.

"अहो ! पुरे आतां. दुसऱ्याला येऊं द्या पुढं !" दुसऱ्या एकानें मोठ्या आवाजांत सूचना करतांच शिट्या आणि टाळ्या यांचा कल्लोळ उठला. पण कविराज वाचीत होते.

'रडसि कां गे ? आईस पुसत लेक
कुसळ पडलें डोळयांत मधां एक'

साधारण वयस्क अशा कवीचें हें काव्यगायन चालू होतें. लहानपणीं लग्न केलेल्या मुलीला लग्न होऊन गेल्यावर चार पांच महिन्यांतच वैधव्य आलें. पण त्या मुलीला आपल्याला कोणती दशा प्राप्त झाली आहे, हें समजण्याइतकेंहि ज्ञान नव्हतें. लोक तिला पाहून विधवा म्हणूं लागले. त्याचा अर्थ तिनें आपल्या आईला विचारल्यावर आईच्या मनावर झालेला परिणाम वरील कडव्यांत कवीनें वर्णिला आहे. तथापि कवितादेहाची कशी ओढाताण कवीनें केली आहे याच्याकडे लक्ष दिल्यास कवीला बसण्याविषयींच्या सूचना श्रोतृवृंदातून कां आल्या हें सहज समजून येण्यासारखें आहे.

श्रोतृवृंदाच्या सूचनेस न जुमानतां हट्टास पेटून कवींनीं आपलें काव्यगायन सुरूच ठेवलें.

"जिच्या ओष्ठींचा वाळला न जार
पिता बनवी तिला प्रापंचिक नार
पती-मुखही पाहिलें न पुरतें
तोंच वैधव्यदशा हाय काय येते ?"

चोहोंकडून टाळ्या आणि शुत्-शुत् असा अवाज उठला. 'खालीं बसा' 'ओढून काढा' 'ढकलून द्या' असे कठोर शब्द निघूं लागले. कवी दोन्ही हात वर करून 'ऐका-ऐका' म्हणून सारखे बोलत होते. इतक्यांत एका धटिंगण श्रोत्यानें कवीच्या कानाकडे आपलें तोंड नेलें.

"आपणांला बाहेरचा रस्ता दाखविण्यासाठीं मी आलों आहे. पुढील प्रयोग करून घेण्याच्या आधीं आपण माझ्या मागून येण्यास तयार आहांत का ?"

कवींनीं डोळे किलकिले करून त्या धटिंगणाकडे पाहिलें. नंतर आर्द्र नयनांनीं श्रोतृवृंदाकडे पाहिलें. आणि तदनंतर पाय आपटीत स्वारी व्यासपीठावरून उतरून बाजूस सरकली.

ते बाजूस निघून गेल्यावर दुसऱ्या कवीचें गाणें सुरू झालें आणि तें श्रोत्यांस आवडल्याचें चिन्हहि दिसलें.

शारदाविहार या संस्थेतर्फे वरील काव्यगायनाचा समारंभ सुरू होता. त्या समारंभांत भाग घेण्यासाठीं कवि "काव्य-डिंभ" यांना फार खस्ता खाव्या लागल्या होत्या. संस्थेच्या सेक्रेटरींना त्यांनीं आपल्या घरीं पुष्कळ वेळां हक्काचें आमंत्रण दिलें होतें. बाळपणीं ज्या शाळेंत त्यांचें शिक्षण झालें, त्या शाळेंत हल्लीं मुलाचें हस्तलिखित मासिक सुरू झालें होतें. त्याच्या एका वर्षाच्या १२ अंकासाठीं लागणारा सर्व खर्च आपण द्यावयाचें कबूल करून त्यांत त्यांनीं आपल्या कविता प्रसिद्ध करावयाचा सपाटा चालविला होता आणि ते सारे अंक त्यांनीं आपल्याजवळ ठेवून घेतले होते. ते अंक त्यांनीं शारदाविहार संस्थेच्या सेक्रेटरींना दाखविले. एक दोन साधारण बऱ्यापैकीं कविता त्यांनीं या सेक्रेटरींना नमुन्यासाठीं म्हणून दाखविल्या. गयावयां करून शेवटीं त्यांनीं सेक्रेटरींना काव्यगायकांच्या मालिकेंत आपलें नांव दाखल करण्यास भाग पाडलें.

आपलें नांव दाखल झालेलें पाहून काव्य-डिंभ यांना आनंद झाला.

एका प्रसिद्ध मासिकाकडून परत आलेली कविताच त्यांनीं गाऊन दाखविण्यासाठीं निवडली. कारण ती कविता त्यांना स्वतःला आवडत होती. पण कोणाहि संपादकाला ती आवडत नव्हती. तरी ती कविता लोकांच्या बोकांडी लादण्याची त्यांची इच्छा दृढतर होत गेली. शेवटीं त्यांनीं कविता शारदा-विहार संस्थेच्या संमेलनांत श्रोत्यांच्या कर्णेंद्रियांत घुसविण्याचा अट्टाहास केला असतां काय प्रकार घडला, तो वर येऊन गेलाच आहे.

काव्य-डिंभांना कविता करण्याचा अतिशय नाद. ते कुठल्याशा ऑफिसांत कारकून होते, पण कविता रचण्याचा त्यांचा हव्यास इतका जबर होता, कीं त्यांच्या कवितांचें बाड बरेंच मोठें माजलें होतें. त्यांतील एकेक शस्त्र ते लोकांवर सोडण्यासाठीं एकेका संपादकाकडे पाठवीत, पण तेथून तें त्यांच्या बाडसाद्यांत येऊन थिरावत असे. त्यामुळें त्यांचा सांठा अक्षय झाला होता व दिवसेंदिवस वृद्धिंगत होत होता.

काव्यडिंभांची सांपत्तिक स्थिति चांगली नव्हती. त्यांचें वय तिशीला पोंचलें होतें. त्यांना मूलबाळ कांहीं नव्हतें. ‘माझ्या कविता हींच माझीं मुलें!’ असें ते आपल्या पत्नीला वारंवार म्हणत असत. तथापि मुलावरची सुप्तावस्थेंतली माया त्या चोपड्यांतील बालकांवर कशी करावी आणि मातृवात्सल्याची आपली तहान भागवावी हें त्या बिचारीला नीटसें समजत नव्हतें. काव्यडिंभांनां पोटापुरता पगार मिळे, तो त्या दोघांच्या खर्चाला जेमतेम पुरत असे. त्याच्याकडे द्रव्य-संचय असा नव्हताच.

आणि द्रव्यसंचय असता तर...?

काव्यडिंभापाशीं जर का द्रव्यसंचय असता, तर त्यांनीं आपलीं बाडें छापून प्रत्येक साक्षर मनुष्याच्या घरीं नेऊन त्याच्या उरावर बसविलीं असतीं! लोकांनीं विकत घेतली नसतीं, तर त्यांनीं मोफत वाटलीं असती. पुस्तक ओळन् ओळ समग्र वाचून पाहाणें हीच माझ्या पुस्तकाची किंमत असें त्यांनीं उघडपणें जाहीर करून पुस्तक वाटलें असतें. परंतु—!

त्रिवेणीबाईचें शिक्षण चांगलें लिहितां वाचतां येण्याइतकें झालें होतें. आणि काव्य-डिंभ मराठी सातवी पास होऊन नोकरीला लागले होते. त्यांना मराठी वाचनाचा मात्र दांडगा शोक होता. पण ते पत्नी अशिक्षित म्हणून फार नाराज होते. त्यांना पत्नीच्या अज्ञानाविषयीं जें फार दुःख होई, त्याचें

मुख्य कारण त्यांची काव्यें तिला समजत नसत हें होतें. त्यांच्या काव्यांतल्या मकरंदाची रुचि तिला चाखतां येत नाहीं म्हणून ते तिच्यावर नाखूष असत व तसें त्यांनीं तिला वारंवार बोलून हिणवावें असेंहि पुष्कळदां चाले. बिचारीला त्यामुळें अतिशय दुःख होई. तथापि त्यांच्या नेहमींच्या काव्य-प्रसिद्धीच्या बाबतींतल्या निराशेवर प्रकाशक लोक गाजरपारखी कीं काव्य-डिंभांची काव्येंच त्या लायकींची, याचा निर्णय तिला करतां येत नसे. तथापि जिकडून तिकडून परतून आलेल्या कविता नीट जपून ठेवतांना काव्यडिंभ केव्हां अस्पष्ट आणि केव्हां स्पष्ट शब्दांत जे शब्द पुटपुटत असत, ते जर त्यांच्या काव्यांतीलच असतील तर काव्यें परतून येतात तें कांहीं केवळ गैर नाहीं असें तिच्या निरागस मनाला वाटे. असें असलें तरी त्यांची दररोजची खिन्नता पाहून तिला त्यांची कींव येई. त्यांचें दुःख नाहींसें करावयाला आपल्याला कांहींच करतां येण्यासारखें नाहीं काय, असें तिला वाटे व त्याच चिंतेंत ती बिचारी निमग्न असे.

शारदाविहार संस्थेच्या संमेलनांत काव्यडिंभाची झालेली फजिती त्यांच्या पत्नींच्या कानीं आल्याशिवाय कशी राहील? काव्यडिंभाचा स्वभाव चिकाटीचा होता, कीं हट्टी होता, कीं दुराग्रही होता हे ठरविणें कठीण आहे. पहिल्या प्रथम त्यानीं कविता लिहावयास सुरवात केल्यापासून जें जें वाङ्मय त्यांच्या हातून आतांपर्यंत निर्माण झालें, तें सारें लोकांनीं वाचलेंच पाहिजे असें त्यांच्या जिवास वाटे. साधारण परिचयाच्या अशा एका प्रकाशक कंपनीस आपला काव्यसंग्रह छापून प्रसिद्ध करण्याविषयीं गळ घालण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यांच्या बोलण्यावरून हा त्यांचा निश्चय ध्वनित झालेला ऐकल्यापासून त्रिवेणीबाईनीं त्यांच्या लेखन व्यवहारावर बारीक नजर ठेवली. त्यांना कांहीं तरी कल्पना सुचली अलवी हें खास.

* * *

"झक् मारतात हे प्रकाशक"......वगैरे वगैरे बरेचसे उद्गार काव्य-डिंभाच्या तोंडून निघालेले त्याच्या पत्नीनें ऐकले आणि ती बाहेर आली. तोंच दारातून पोस्टमन जात असलेला त्यांना दिसला. जातांना तो आपल्याशींच हसत जात होता, त्यावरून पतिराजांच्या तोंडून निघालेली मुक्ताफळें त्या मिस्किल पिशवीवाल्यानें ऐकलीं असावींत असें वाटून त्रिवेणी

बाई थोडाशा खजीलहि झाल्या. त्यानीं हळूच दाराआडून डोकावलें, तो काव्यडिंभ हातांत एक कार्ड घेऊन असंख्य उद्गारांचा वर्षाव करीत होते. ते शुद्ध छापावयाचे झाल्यास कोणत्याहि मराठी छापखान्यांतील उद्गारचिन्हें पुरीं पडलीं नसतीं. काव्यडिंभांनीं त्या कार्डाचे चार तुकडे करून केराच्या टोपलींत टाकले आणि ते बाहेर फिरावयास जाण्यासाठीं उठले. त्रिवेणीबाई मागच्याच पावलीं घरांत परतल्या.

काव्यडिंभाची स्वारी बाहेर पडून गेल्यावर त्रिवेणीबाईनीं त्या चार तुकड्यांची एकत्र जुळणी केली. तेव्हां पुढील मजकूर त्यांना चक्क दिसला.

× × × आणि कंपनी
बुकसेलर्स आणि पब्लिशर्स
पुणें.

× × × आपलें पत्र व कवितांचें पुडकें पाहिलें. तें छापावयाचें असल्यास छपाईचा खर्च द्यावा लागेल. त्याचा सरासरी आंकडा पुढें दिला आहे. हें पुस्तक आम्हीं आमच्या खर्चानें प्रसिद्ध करूं इच्छित नाहीं. पुडकें परत पाहिजे असल्यास पुरेसें टपाल हंशील पाठवावें.

* * *

पत्रांत छपाईच्या तपशिलाचे आंकडे दिले होते व शेवटीं मॅनेजरची सही होती.

काव्यडिंभांच्या उद्गारांचा व त्यांच्या त्रासिक चेहऱ्याचा उलगडा त्रिवेणीबाईंना झाला. त्यांनीं ते चारहि तुकडे उचलून घेतले.

दुसऱ्याच दिवशीं काव्यडिंभांनीं पुडकें पाठवितांना रजिस्टर केल्याची पोस्टाची पावती काढली. तिच्यावरील आंकडा पाहून त्यांची मुद्रा खिन्न झाली. कारण पगार व्हावयाला बराच अवधि होता आणि पुडक्याचें बुकपोस्ट राजिस्टर करावयास खर्च ३–८–० आला होता. काव्यडिंभांचा निमेशिंमे पगार पोस्टखात्याच्या पेटींत पडत असे ! अनेकांना अनेक व्यसनें असतात. काव्यडिंभांना हें एक व्यसन होतें. त्यांनीं पत्नीला हाक मारून कांहीं पैसे आहेत का म्हणून विचारलें, परंतु त्यांचा नकारच ऐकावा लागला. त्यांचा नाईलाज झाला. पगार मिळेपर्यंत पुडकें परत मागविण्यासाठीं पाठवावयाच्या टपालखर्चाचे पैसे पाठवितां येणें शक्य नव्हतें.

आणखी चार दिवस गेले आणि पोस्टमननें काव्यडिंभांच्या हातांत एक पाकीट दिलें, आणि त्याच वेळेस त्रिवेणीबाईसहि एक पाकीट मिळालें. काव्यडिंभांच्या हातांतील पत्रावर त्याच प्रकाशक कंपनीची जाहिरात छापलेली होती. कपाळास सुरकुत्या घालून त्यांनीं अनेक उद्गार काढीत पाकीट फोडलें आणि आंतील मजकूर पाहूं लागले. पत्र फोडण्याच्या पूर्वी बाह्यांगाची निरीक्षण करण्याची काव्यडिंभांची संवय होती त्यामुळें तितक्या वेळांत त्रिवेणीबाई आपलें पत्र वाचून प्रफुल्लित मुद्रेनें पतिराजांच्या चेहऱ्याचें आड राहून सूक्ष्म निरीक्षण करूं लागल्या.

एकेका ओळीवरून नजर फिरवीत असतां काव्यडिंभांचा चेहरा प्रसन्न, प्रफुल्लित, फारच फुललेला दिसून आला. तें पत्र त्यांनीं जवळ धरून, एकदा या बाजूस एकदा त्या बाजूस असें धरून वाचलें. त्यांनीं त्या पत्रास दश-दिशांचे पाठ दिले. जणूं काय ते त्या पत्राला भूगोलाचा श्रीगणेशाच शिकवीत होते ! नंतर त्यांनीं तें पत्र उठून, चालत, तिरव्या नजरेनें डोळे बारीक करून, मोठे करून असेंहि वाचून पाहिलें. त्रिवेणीबाई चाहूल लागूं न देतां ही सर्व कसरत पाहात होत्या आणि त्यांना हसें आवरत नव्हतें. काव्यडिंभांनीं आपली पेटी उघडून तें पत्र ठेविलें आणि पुन्हा बाहेर काढलें. शेवटीं त्यांच्या तोंडून एक वाक्य मोठ्यानें बाहेर पडलें. "आतां दाखवितों सर्वांना चमत्कार !"

ही संधि साधून त्रिवेणीबाई पुढें येत होत्या आणि काव्यडिंभ पत्नीला हें पत्र वाचून दाखविण्याकरिता बाहेर पडत होते. त्यांची दारांतच टक्कर झाली.

"बाई–बाई–बाई ! काय बरं ही घाई ! हाच काय तो चमत्कार ?"

"अग–चमत्कार तर निराळाच आहे. पण तो तुला आतां मी सांगूं इच्छित नाहीं." काव्यडिंभ आपला पहिला बेत फिरवून म्हणाले. त्यांच्या मनांत पत्नीला मागाहून एकदम चकित करावयाचें होतें. त्यांचा कविता संग्रह छापून निघायचा होता.

"तरी पण—"

"पण–बीण कांहीं नाहीं. आणि आतां ते साडेतीन रुपये मला नकोत.

तूं कसली अगदींच अरसिक आहेस. माझीं काव्यें तूं वाचीत नाहींस वाचून दाखविलीं तर ऐकत नाहींस. बळजबरीनें ऐकविलींच तर तुला त्यांतला रस, अलंकार, यमक, प्रास, मौज, गंमत कांहींच कळत नाहीं. तुझ्याशीं बोलायचं काय ? आणि तुला सांगायचं काय ?..."

काव्यडिंभ फिरावयास बाहेर झटकले. ते आपल्याकडचें पत्र मागतील, निदान त्याविषयीं चौकशी तरी करतील अशी भीति त्रिवेणीबाईस वाटत होती, परंतु आनंदातिरेकांत काव्यडिंभ कांहीं एक न विचारतां निघून गेले.

दरम्यान त्यांना त्या प्रकाशकाकडून मधून मधून पत्रें येत असत, पण त्याच दिवशीं बहुधा त्रिवेणीबाईसही पत्र येई. सणाषण्मासीं माहेरून एखादें पत्र आपल्या पत्नीस यायचें, त्याऐवजीं आतांशा नेहमीं पत्र येत असलेलें पाहून काव्यडिंभांस थोडेंसें नवल वाटलें. पण तें थोडेंसेंच.

शेवटीं ठरलेल्या दिवशीं कविता संग्रहाच्या पन्नास प्रतींचें पार्सल आलेलें काव्यडिंभांस मिळालें. त्यांत त्यांच्या कवितांचें पुडकेंही गुंडाळलेलें होते. त्यांनीं प्रथम तें पुडकें उघडलें; त्यांत आरंभीं आरंभींच्या साऱ्या कविता होत्या, व अखेरी अखेरीच्या कविता छापण्यासाठीं घेतल्यामुळें दिसत नव्हत्या. नंतर त्यांनीं आपला कवितासंग्रह पाहिला. पुस्तकाचें बाह्यांग, कव्हरवरील सजावट, आंतील कागद, छपाई, टाईप, बांधणी, सर्व कांहीं फारच सुंदर होतें. आपल्या इष्टमित्रांस वाटण्यासाठींच कमींत कमी ५० प्रती पाहिजेत असें काव्यडिंभांनीं प्रकाशकांस लिहिलें होतें. अभिप्रायाच्या व विक्रीच्या प्रति प्रकाशकाकडेच राहावयाच्या असें प्रकाशकांनीं आगाऊ कळविलें असल्यामुळें काव्यडिंभानीं पुस्तकें कोणाकोणास द्यावयाचीं त्याची यादी पूर्वींच करून ठेविली होती ती बाहेर काढली. त्यांनीं पहिल्याच प्रतीवर आपल्या पत्नीचें नांव घालून तें तिला देण्यासाठीं बाजूस काढून ठेवलें.

भोजनोत्तर त्यांनीं आपल्या पत्नीस जवळ बोलाविलें. आपणांस काहींच ठाऊक नाहीं, असा बहाणा करून त्या पुढें आल्या.

" हं ! हें घ्या तुम्हांला. " काव्यडिंभ आपल्या पत्नीच्या मुखाकडे हास्य-मुद्रेनें पाहात म्हणाले.

" काय हें ? कोणाचं पुस्तक ? नि कसलं ? "

" अरेरे! दुर्दैव माझं! तुला इतकं देखील ज्ञान असूं नये ना! हा माझा कविता-संग्रह आहे. मात्र या प्रकाशकानें माझें टोपण नांव न घालतां खरें नांव सबंधच्या"सबंध घातलें आहे त्याबद्दल मला अतिशय राग आला आहे त्याचा. माझा कविता-संग्रह प्रसिद्ध झालेला पाहून माझी थट्टा करणाऱ्याचीं नाकें खालीं पडतील. शारदा-विहार संस्थेला मी एक पत्र पाठविणार आहें. पण तुला माझ्या या कविता संग्रहाचें स्वारस्य समजेल का?"

" मी हल्लीं वाचनाची संवय ठेवली आहे. हा संग्रहदेखील मी संबंध वाचीन. मला समजणार नाहीं तें आपण समजावून द्याल ना?"

" अलबत. तें पुस्तक तूं आपल्या हृदयाजवळ घेतलें आहेस आणि त्यामुळें तूं किती शोभिवंत दिसतेस पण! प्रत्यक्ष सरस्वतीच. पण खरं सांगूं का? नाहीं तर विनाकारण लांब सुस्कारा टाकशील! मुलाला हृदयावर खेळवणाऱ्या पोक्त मातृदेवतेसारखी तूं शोभतेस."

त्रिवेणीबाई आंत गेल्या आणि 'काव्यडिंभ' आपल्या खोलींत बसून लिहूं लागले. इतक्या वर्षांच्या दीर्घ तपस्येची कसोटी पाहून आज खरोखरीच त्याना सरस्वती प्रसन्न झाली होती. वृत्ति उचंबळून आली होती. भावना जागृत झाली होती. प्रतिभा स्फुरण पावली होती. हृदयांत दिव्यज्योत प्रज्वलित झाल्यासारखेंच वाटत होतें. साधारण मनुष्याचीं मुलें आणि कवीचीं काव्यें याविषयींचे उदात्त विचार त्यांच्या मनांत थैमान घालीत होते. सत्कवीचीं मुले–त्यांचीं काव्यें–रसिकांच्या हृदयावर कशीं खेळतात, त्यांची जोपासना रसिक किती काळजीपूर्वक करितात, त्यांचें कसें कोडकौतुक होतें, त्यांची कशी वाहवा होते, आणि त्यांचा जनक–म्हणजे कवि–त्यामुळें कसा धन्य होतो, इत्यादि विचार त्या प्रतिभेच्या उद्रेकांत कागदावर नकळत पडून गेले. दीर्घ व्यासंगानें त्यांची भाषा आतां सफाईदार झाली होती. त्यांनीं दुसऱ्याच दिवशीं ती कविता लिहून काढून एका अधिक दर्जाच्या मासिकाच्या संपादकाकडे पाठवून दिली.

ती कविता त्यांनीं पाठवून दिल्यावर एके दिवशीं त्रिवेणीबाईनीं आपला कविता-संग्रह कितीसा वाचला आहे हें पाहाण्यासाठीं त्यांनीं त्या घरांत नाहींतसें पाहून, त्यांना दिलेली पुस्तकाची प्रत उघडून पाहिली, तों त्यांत खुणेसाठीं घातलेलें एक पत्र दिसलें. पत्र वाचूं नये असें त्यांना प्रथम वाटलें.

पण वरती छापील शिक्का दिसला. तो पाहातां एका प्रकाशकाचा छापील पत्ता दिसला आणि तो त्यांच्याच प्रकाशकाच्या कंपनीचा होता.

आपल्या पत्नीला त्या प्रकाशकाचें पत्र तरी काय आलें असावें म्हणून त्यांनीं वाचण्यास आरंभ केला, तसतसें त्याचें अंतःकरण सद्गदित झालें, व त्यांच्या चेहऱ्यावर क्षणांत आनंद, क्षणांत कृतज्ञता, क्षणांत तिरस्कार, तर क्षणात खिन्नता असे मनोविकार प्रगट होऊं लागले. तें पत्र असें होतें.

"× × × आपलें पत्र मिळालें. आपल्या पतिराजांच्या कवितांचें पुडकें आतां आम्ही परत करीत नाहीं व आपण जसा मजकूर कळवाल, तशाच मजकुराचीं पत्रें त्यांस पाठवीत जाऊं व आपल्या सूचनाप्रमाणें आम्ही वागत जाऊं. मात्र पन्नास प्रतींच्या छपाईच्या पैशांपैकीं आगाऊ येथील आपल्या बंधूकडून आम्हांस पोंचता होईल असें करावें. त्या पुडक्यांतील आरंभींच्या कविता अगदींच टाकाऊ आहेत. पुढील कवितांतील कल्पना साधारण चांगल्या आहेत, पण त्यांत खरी स्फूर्ति दिसत नाहीं. कृत्रिमपणा फार दिसतो. तथापि आपल्या काव्यपरीक्षकाकडून त्या दुरुस्त करून घेऊन आम्ही आपल्या आग्रहासाठीं छापून काढीत आहोंत. काळजी नसावी. पुस्तकें तयार होतांच त्यांना पाठवून देऊं. राहिलेलें निमें बिल पुस्तकें इकडून पाठविल्यावर आपल्या बंधूमार्फत भागविण्यांत यावें. आपल्याशीं झालेल्या पत्रव्यवहाराची त्यांना बिलकुल जाणीव देण्यांत येणार नाहीं. त्यांच्या पत्रांतील मजकूर आपणांस कळवीत जाऊं याविषयीं खात्री बाळगावी. × × ×"

समग्र पत्र वाचून झाल्यावर ते तेथेंच बसले आणि विचारमग्न झाले. एकूण आपण खरे कवि नाहीं, कवि होण्याइतकी आपली लायकी नाहीं, असें वाटून त्यांच्या चेहऱ्यावर उदासीनता पसरली.

इतक्यांत त्यांना बाहेर पावलांचा अवाज ऐकूं आला. त्रिवेणीबाई नुकत्याच आल्या होत्या व तितक्यांतच पोस्टमन त्यांच्या हातांत एक पत्र देऊन गेला होता.

काव्यडिंभ बाहेर आले. पत्नीवर त्यांची नजर पडतांच त्यांनीं चमत्कारिक मुद्रा करून तिला म्हटलें, "एकूण मी नालायकच तर!"

"असं कोण म्हणतं?" त्रिवेणीबाई हसत म्हणाल्या.

"नालायकच. तुझ्या पुस्तकांतील पत्र मीं वाचलं!"

"कां-कां?" त्रिवेणीबाई चमकून म्हणाल्या, "हें योग्य नाहीं. आपण माझं पत्र कां वाचलं? हें आपलं कार्ड वाचून पाहा, म्हणजे तुमच्या सत्कवित्वाच्या लायकीचा दाखला तुम्हांला दिसेल."

काव्यडिंभांनीं तें पत्र वाचलें. त्यांत त्यांच्या कवितेची ओतप्रोत स्तुति केली असून ती पुढील अंकांत छापून येत असल्याचें त्या मासिकाच्या संपादकांनीं कळविलें होतें.

आणि खरोखर ती कविता प्रसिद्ध झाल्यावर त्या कवितेची फार प्रशंसा झाली.

# मिळविला लाल

**शेवटीं** चंद्रकांतानेंच तो लाल विकत घेतला. किंमत सारखी चढत गेली. पण चंद्रकांताचा आंकडा शेवटचा ठरला. वास्तविक ती लाल मण्याची आंगठी होती. पण आंगठीला महत्व नव्हतें. महत्व होतें तें त्या मण्याचें. म्हणून आंगठी न म्हणतां लाल असेंच म्हटलें. लाल पाणीदार होता.

पैसा भरून लाल हातांत येतांच ती सुंदर डबी खिशांत घालून चंद्रकांत छगनलाल मगनलाल आणि कंपनीच्या दुकानातून बाहेर पडत असतांच पुढील शब्द चंद्रकाताच्या कानावर आले—

"तो लाल मला पाहिजे होता."

"माफ करा!" चंद्रकांत म्हणाला आणि झटकन् निसटला. गर्दीतून वाट काढीत असतांना तो बोलत होता. पण नंतर त्यानें लाल मागणाऱ्या व्यक्तीकडे पाहिलें तों-अहाहा, तो चेहरा अत्यंत सुंदर असून यावेळीं तो केविलवाणा झालेला त्याला दिसला. शब्दांतील आर्जवी मोहकतेनें त्याचें मन वेधलें आणि त्यानें त्या चेहऱ्याकडे पाहिलें. ती एक नवयौवनवती सुंदर बाला होती.

हे सर्व खरें, पण तिला तो लाल विकत द्यावयास चंद्रकांत मुळींच तयार नव्हता. तो निसटून चालला होता.

"मला तो लाल पाहिजेच." त्या बालिकेनें पुनः लगट करून म्हटलें.

"पण मला तो द्यावयाचा नाहीं—" चंद्रकांतानें जरासें कठोरपणानेंच म्हटलें. त्यानें टॅक्सीवाल्याला खूण केली. दार उघडून तो आंत बसला. मोटार चालूं लागणार, तोंच ती धिटोरी मुलगीहि मोटारीचें दार उघडून आंत बसली! ती मुलगी केवळ निराश झाली होती एवढेंच नव्हे, तर थोडीशी भ्यालेलीहि दिसत होती. केवळ निरुपायास्तव तिला मोटरींत चढून अनोळखी मनुष्याबरोबर बसावें लागून मोटर जाईल तिकडे जावें

लागत होतें. तिला तो लाल पाहिजे होता. आणि त्यासाठीं तिला मोटरींत चढण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. कारण चंद्रकांताचा पत्ता तिला माहित नव्हता आणि ओळख तर मुळींच नव्हती.

पण तो लाल हस्तगत करावयास चंद्रकांताला आपल्या जवळची बहुतेक सारी पुंजी घालावी लागली होती. एका ऑफिसांत त्याला नोकरी होती. तरी तो, त्याची आई, एक बहीण आणि एक भाऊ यांचा खर्च भागवितां भागवितां त्याला पुरे पुरे होई. भाऊ व बहीण यांचा अभ्यास चालू होता नोकरी लागल्यापासून गेल्या तीन चार वर्षांत शिकस्तीनें सांठवून ठेवलेली पुंजी त्यानें आज खर्चिली म्हणावयास हरकत नाहीं. त्यामुळें त्याचें मन चिंताक्रांत झालें होतें.

छगनलाल मगनलाल आणि कंपनीचा जवाहिराचा व्यापार होता. मधून मधून ते क्लिअरन्स सेल करीत असत व कधीं कधीं जवाहिराचा लिलांवहि करीत असत. चंद्रकांताला लिलांवानें जवाहिर विकलें जाणार हें ठाऊक होतें व तो केवळ प्रेक्षक म्हणून त्या दुकानांत आला होता. त्याच्याच ऑफिसांतल्या दुसऱ्या एका इसमानें आजच्या लिलावांत एक चमत्कारिक लाल विकला जावयाचा आहे असें त्यास सांगितल्यामुळें त्याची जिज्ञासा जागृत झाली होती. शिल्लक पडलेली रक्कम तो बँकेंत ठेवण्यासाठीं चालला असतां वाटेंत लिलांवदाराचे शब्द ऐकून तो दुकानात चढला.

“ हा लाल घेईल तो भाग्यास चढेल. याचा गुण फारच चमत्कारिक आहे......” हे ते शब्द होते.

“ पाऊणशे रुपये. ” एक जण म्हणाला.

“पाऊणशें रुपये—पाऊणशें रुपये! इतक्या उंची रत्नाची किंमत म्हणजे थट्टाच नव्हे काय? याची पारख करणारा रत्नपारखी या समाजात नसेल असें मला वाटत नाहीं. याची किंमत हजारों रुपये आहे. दोन हजार तरी याचे आलेच पाहिजेत. या. बोला. कोणी रत्नपारखी बोला......”

“ शंभर ! ” चंद्रकाताच्या शेजारच्याच एका इसमानें म्हटलें.

चंद्रकांतानें त्याच्याकडे तिरस्कारानें पाहिलें. तो एक लठ्ठ माणूस असून शरीरानें बोजड आणि दिसण्यांत बेढब होता. त्याच्या कानांत कुडुक होतें. डोकीस जरीचा तांबडा रुमाल होता. पानसुपारी खाऊन तांबडे झालेले ओंठ

म्हणजे काळ्या कागदावर तांबड्या शाईची जाडशी दुरेघीच होती. पोपाख धामट झालेला दिसत होता.

"सव्वाशें!" चंद्रकांत मोठ्यानें म्हणाला आणि त्यानें आपल्या प्रतिस्पर्ध्याकडे पाहिलें.

"दीडशें!" त्याच्या प्रतिस्पर्ध्यानें आंकडा चढविला. चंद्रकात इर्षेस चढला. त्या दोघांच्या चढाओढीनें इतर लोक नुसते प्रेक्षक बनून राहिले. शेवटपर्यंत कोण टिकतो हेंच जणूं त्यांस पाहावयाचें होतें. ते त्या दोघांकडेहि आळीपाळीनें पाहात होते. चंद्रकांत त्यांना पैशाची फिकीर न बाळगणारा व आपला शब्द खरा करण्याकरितां वाटेल तें करणारा असा करारी स्वभावाचा दिसत होता. त्याचा प्रतिस्पर्धी व्यवहारज्ञ व हिशेबी स्वभावाचा आणि व्यापारी बाण्याचा असावासा दिसत होता.

"अडीचशें रुपये!" चंद्रकांतानें प्रतिपक्षास चूप करण्याच्या ऐटीनें म्हटलें. आणि त्या ऐटीनें त्याचा प्रतिपक्षी चीन झाल्यासारखाच दिसला. तो विचाररमग्न झाला. अडीचशें रुपयांवर आंकडा चढविण्यास कोणीच पुढें येईना. लिलांव पुकारणारा सारखा ओरडत होता. त्याचा नाइलाज झाला. शेवटीं तो म्हणाला,

"अडीचशें रुपये मी रोख द्यायला तयार आहें. माझा शब्द मागें घ्यावयास मला परवानगी द्यावी. आमचें यांत हकनाक नुकसान होत आहे. भलत्या माणसासमोर भलता माल मांडला म्हणजे अशीच स्थिति व्हावयाची..."

"पाचशें रुपये!" चंद्रकांताचा प्रतिस्पर्धी ओरडला.

"पाचशें रुपये एकवार—"

"पांचशें रुपये दोनवार—"

"सहाशें रुपये!"–भुवया चढवून चंद्रकांत म्हणाला.

सहाशें रुपये तीनवार पुकारण्यात आले. चंद्रकांतानें खिशांतून नोटा काढून किंमत मोजली आणि लाल घेऊन तो निघण्याच्या बेतांत असतांनाच एक तरुणी मोटारींतून उतरून तो लाल घ्यावयास लगबगीनें आंत शिरत होती. परंतु एकाच मिनिटाची तफावत. लाल गेला. तिचें तोंड खर्रकन् उतरलें. तिला चंद्रकांताकडे दीनवाणीपणें याचना करावी लागली.

पण ती त्याच्याकडे तो लाल मागत असतांच त्याचा प्रतिस्पर्धी त्याच्याकडे आला आणि सातशें रुपये द्यावयास कबूल झाला. त्या तरुणीनें हें ऐकलें. हें एक नवीनचें संकट आलेंसें तिला वाटलें. चंद्रकांतानें आपल्या प्रतिस्पर्ध्यास स्पष्ट नकार दिला. आणखी एकदोन माणसें त्याच्या कोटाला धरून ओढीत होतींच; पण तो मोटारींत चढल्यावर त्याच्या पाठीमागून जाणारी अशी ती एक तरुणीच !

त्या लिलावांतल्या प्रकारानें त्याचें मस्तक फिरून गेल्यासारखें झालें होतें. पण मोटार एका पुलावरून खालीं उतरत असतां थोडासा धक्का बसल्यामुळें आपल्या शेजारीं बसलेल्या तरुणीकडे त्याचें लक्ष गेलें. त्यानें तिच्याकडे एकवार पाहिलें. ती दुसरीकडे तोंड फिरवून बसली होती, पण मधून मधून ती समोर पाही. तिचे ओठ आणि आपल्या खिशांतील पेटींतील लाल यांत अधिक पाणीदार कोण असा प्रश्न क्षणभर त्याच्या मनांत येऊन गेला. आपण एक लाल विकत घेतला. तो लाल भाग्यशाली आहे, असें तो व्यापारी ओरडून सारखा सांगत होता. मग आपल्याला हा भाग्यशाली लाल आणखी एक विक्रमाची जोडी प्राप्त करून देणार कीं काय अशी एक स्वार्थी कल्पना त्याच्या मनात आली. पण लगेच त्यानें आपल्या मनाची निर्भत्सना केली आणि तसले अप्रयोजक विचार त्यानें आपल्या मनांतून धुडकावून दिले.

त्यानें पुनः तिच्याकडे पाहिलें. ती शीलवती, कुलवती, सुशिक्षित आणि श्रीमंताची मुलगी आहे असें त्याला दिसून आलें तिचा पोशाख साधा आणि सुंदर होता. मोटर चालू होती, पण निघण्याच्या घाईत त्यानें मोटारवाल्याला ठिकाणा सांगितलेला नव्हता आता त्याच्या हें लक्षांत आलें. म्हणून त्यानें मोटर थांबविण्यास खूण केली.

"आपणांला कुठं जायचं आहे?" मोटर थांबतांच त्या तरुणीला चंद्रकांतानें विचारलें.

"तो लाल मागण्यासाठींच मी तुमच्या मोटरमधून आलें. आपण भरलेल्या किंमतीपेक्षांहि जास्त रक्कम मी भरायला तयार आहें" ती म्हणाली.

"खरी गोष्ट. पण असं पाहा—मी हा लाल घेतला तो त्या लिलांव करणाऱ्या दुकानदाराप्रमाणं विकून नफा मिळविण्यासाठीं घेतलेला नाहीं. निदान यावेळीं तरी माझी तशी इच्छा नाहीं. पुढं मला तसं वाटलं, तर मी

तसं करीन, पण आज माझी तो लाल विकण्याची इच्छा मुळींच नाहीं."

"मीं आठशें रुपये दिले असते. जरूर तर..."

"छे. छे. हजार रुपये दिलेत तरी मी तो विकावयास आज तयार नाहीं. रागावूं नका. मी तो मुद्दामच घेतला आहे. बरें तें राहूं द्या;" तो विषय बदलण्याचा हेतूनें म्हणाला, "तुम्हांला या मोटरीची जरूर आहे काय?"

"नाहीं."

चंद्रकांतानें मोटरवाल्याला पैसे दिले व तो खालीं उतरला. त्याबरोबर त्या तरुणीलाहि खालीं उतरणें भाग पडलें. पायांनीं चालत ती आपला पाठलाग करूं शकणार नाहीं अशा कल्पनेनेंच त्यानें मुद्दाम हा डाव टाकला होता.

"बरं, आतां मी जातों; मला अझून पुष्कळ ठिकाणीं जायचें आहे." असें म्हणून तो जाऊं लागला.

"जरा थांबा." ती तरुणीं जराशी संकोचानेंच म्हणाली. "आपला पत्ता मला द्या ना!"

"ठीक–ठीक! हा घ्या" असें म्हणून त्यानें आपल्या नांवाच्या कार्डावर पेन्सिलीनें पत्ता लिहून तें तिच्याकडे दिलें. "बरं जातों मी...या कांहीं विशेष असलं तर..." असें औपचारिक कांहीं तरी बोलून त्यानें तेथून पाय काढिला. मागें वळून पाहातो, तों ती तरुणी झपाट्यानें चालूं लागली होती. तिच्याकडे त्याचें लक्ष लागलें. पण तेथें रस्त्यावर तिच्याकडे पाहात राहाणें त्याला शक्य नव्हतें. तिच्याबद्दलचेच विचार मनांत घोळत असतां तो आपल्या बिऱ्हाडीं येऊन पोंचला.

त्या तरुणीशीं आपण केलेली वागणूक सभ्यपणाला तरी शोभण्यासारखी होती का? आपल्या या वर्तनाचा तिच्या मनावर काय बरें परिणाम झाला असेल? आपण तिची क्षमा तरी मागायास पाहिजे होती; आपण तिरस्कारानें व आढ्यतेनें आपला पत्ता दिला, पण तिचा पत्ता कांहीं आपण घेतला नाहीं; या असल्या तुसड्या वर्तनाबद्दल त्याला स्वतःचा फार राग आला. पण ती आतां पुनः केव्हां येते याची वाट पाहात बसल्याशिवाय त्याला कांहींच गत्यंतर नव्हतें.

पण ते विचार त्याला तत्क्षणींच धुडकावून द्यावे लागले. असलेली सारी

पूंजी तो गमावून बसला होता आणि खर्चांची तोंडें 'आ' पसरून त्याला गिळंकृत करायला बसलीं होतीं. चालू खर्च भागवावा कसा हा मोठा प्रश्न येऊन पडला.

खुंटीवर कपडे उतरून ठेवीत असतांच त्याची बहीण त्याच्याकडे येऊन फीची आठवण करून निघून गेली. भावानें कपड्यांचें बिल पुढें ठेविलें. भाड्याचें बिल टेबलावर पडलेंच होतें. टेबलावर साप्ताहिक क्रॉनिकलचा अंक होता. त्याच्याकडे त्याचें तशा व्यग्र स्थितींतहि लक्ष वेधलें. त्यांत कॉंपिटिशन पझल होतें. त्या सेटपैकीं तो सहावा हप्ता होता. आजचा दिवस उत्तर पाठविण्याचा शेवटचा होता. त्यानें आपलीं उत्तरें तपासून पाहिलीं व अटींप्रमाणें बरोबर तीं उत्तरें क्रॉनिकल ऑफिसांत पाठवून दिलीं. त्या व्यवसायांत कांहीं वेळ गेला. पुनश्च काळजी उभी. जवाहिऱ्याच्या दुकानांत शिरत असतांच त्यानें त्या दिवशींच्या रजेबद्दल ऑफिसांत चिठी पाठविली होती. पण आतां त्याचें लक्ष कशाकडेच लागेना.

पैशाची त्याला फार निकड होती. पण आपल्या श्रमानें पैसा मिळवावा अशा तत्त्वाचा तो होता. तथापि आज त्याच्या चित्तवृत्तींत थोडासा फरक पडला होता. अनीतीच्या मार्गास न जातां पैसा मिळविण्याचें त्याला एकहि साधन दिसेना. तो पुनः आंगावर कपडे चढवून बाहेर पडला. महालक्ष्मीच्या वाटेनें त्याचे पाय चालूं लागले. वाटेंत एक फेरीवाला लॉटरीचीं तिकिटें विकीत होता. लॉटरी घेणें बरें नव्हे, असें त्याचें ठाम मत होतें व तसा तो लोकांनाहि उपदेश करी. त्यानें आपलें मन आवरून धरिलें. शिवाय त्याच्याकडे फारसा पैसा नव्हता. विचारांच्या तंद्रींत वाटचाल करीत असतां तो थोडक्याच वेळांत महालक्ष्मीपाशीं जाऊन पोंचला. आणि पाहातो तों रेसकोर्सवर भयंकर गर्दी उसळली होती. रेस जोरांत चालू होती. "लखपती" "लखपती" अशी जिकडे तिकडे ओरड चालू होती. चंद्रकांताचें मन थरथरूं लागलें. त्यानें खिशांत हात घातला. सारे चारच रुपये होते. त्यानें एकाकडून उसने रुपये घेऊन भरती करून घोड्यावर लावले आणि नशिबाचा खेळ पाहात बसला

त्याचा डाव साधला. उसने घेतलेले पैसे त्यानें परत केले आणि पुढच्या मोहजालांत न सांपडतां तो घराकडे जाण्यासाठीं मागें वळला. तात्पुरतीं

जिकिरीवर आलेलीं बिलें भागविण्यापुरती रक्कम आतां त्याच्या खिशांत खुळखुळूं लागली होती.

ग्रँटरोडपाशीं येतांच त्याला तो फेरीवाला फिरून आढळला. या वेळीं त्याच्याभोंवतीं गिऱ्हाइकांची गर्दी झाली होती. तिकिटें भराभर फाडून देण्यांत तो गुंतला होता. शेवटीं एकच तिकिट शिल्लक राहिलें होतें. घ्यावें कीं न घ्यावें असा विचार क्षणभरच त्याच्या मनांत येऊन गेला. पण तदनंतर लगेच त्याचा निश्चय ठरला. तें तिकिट शेवटचेंच होतें म्हणून कीं काय नकळे, पण त्यानें पांच रुपये खर्च केल्यास अगदींच अडचण होईल अशी त्याची स्थिति या वेळीं नव्हती.

काळोख पडूं लागला होता. दिवे लागत होते. त्याला एका बाजूच्या अडचणीच्या व फार प्रकाश नसलेल्या अशा रस्त्यांतून जावें लागत होतें. तो अजूनहि विचारांतच होता. समोरून एक मोटर येत होती. ती चुकविण्याकरितां तो बाजूस सरकला, पण ड्रायव्हरच्या हलगर्जीपणामुळें मोटरहि त्याच बाजूस सरकली. इतक्यांत केळ्याच्या सालीवर पाय धसरून चंद्रकांत खालीं पडला. पडतां पडतां त्यानें मडगार्डला धरलें. पण मोटर साफ थांबली नसल्यामुळें त्याला थोडें खरचटलें. आंत कोणीतरी फार श्रीमंत बाई बसली असल्याचें त्यानें ओझरतें पाहिलें होतें. त्यानें मोटारीचा नंबर टिपून घेतला आणि तो ड्रायव्हरकडे येऊं लागला. ड्रायव्हर धनिणीकडे तोंड करून कांहींतरी सांकेतिक भाषेंत बोलत होता. चंद्रकांत पुढें आला, पण तो लंगडा व वेदनाविव्हळ झालेला असा दिसला. मोटारच्या मालकिणीनें त्याला आंत ड्रायव्हरपाशीं बसावयास सांगितलें. पण तो आंत चढावयास कबूल होईना, तेव्हां तिनें आपणाकडे त्याला खुणेनें बोलाविलें आणि जवळ येतांच त्याच्या हातांत एक नोट दिली. ती नोट पन्नास रुपयांची होती. चंद्रकांतानें तिला आदरपूर्वक नमस्कार केला आणि नंबर टिपून घेतलेला कागद तिच्याकडे दिला. तीहि हसली; व चंद्रकांतहि हसला. मोटार आपल्या वाटेनें गेली आणि चंद्रकांत आपल्या वाटेनें चालूं लागला.

चंद्रकांताला आतां तर फारच चमत्कारिक वाटूं लागलें. आजचा सगळा दिवस त्याला साऱ्या आयुष्यांत अतिशय चमत्कृतिपूर्ण वाटत होता.

: ३ :

गेल्या तीन चार दिवसांत विलक्षण योग घडून आल्यामुळें चंद्रकांत त्या लाल मण्याली मुळींच विसंबत नसे. दिवसांतून कितीदां तरी तो त्या मण्याचें दर्शन घेई. खरें म्हटलें, तर त्यानें ती आंगठी आपल्या बोटांतच घालावयाची, पण ती त्याच्या बोटांत बसण्यासारखी नव्हती. आजूबाजूला कोणी नाहीं असें पाहून तो एकांतांत आपल्या खोलींत दरवाजे लावून बसे आणि त्या मण्याला मस्तकावर ठेवी काय, दोरांत अडकावून गळ्यांत लटकावून पाही काय, आणि मनगटांवर घड्याळाच्या जागीं बसवून पाही काय! एखाद्या लहान मुलासारखेच तो त्या लाल मण्याशीं चाळे करूं लागला होता! आणि त्यानें तसें तरी कां करूं नये? गेल्या चार दिवसांत चमत्कारच तसे घडले होते ज्या दिवशीं तो लाल त्याच्या हातीं आला, त्या दिवशीं तो चिंतेंत असतां मोटारवाल्या श्रीमंत बाईकडून त्याला पन्नास रुपये मिळाले नाहींत काय? रेसवर पैसे मिळाले नाहींत काय? शिवाय क्रॉनिकलच्या पझल कॉंपिटिशनचें पहिलें बक्षीस असें आजपर्यंत त्याला कधींच मिळालें नव्हतें. गोव्याची लॉटरी उघडली आणि त्यांत त्याच्या तिकिटास एक हजार रुपयांचें बक्षीस मिळाल्याचेंहि त्याला समजलें होतें. मग त्याची त्या लाल मण्यावर भक्ति कां बरें जडूं नये? "हा लाल जो जवळ बाळगील तो भाग्यास चढेल" हे लिलांवाच्या वेळचे सेल्समनूचे शब्द त्याला क्षणोक्षणीं आठवूं लागले.

रविवारची सुटी असल्यामुळें तो आज घरींच स्वस्थ होता. आपल्या आवडत्या साप्ताहिक क्रॉनिकलचा नवा अंक चाळीत तो बसला होता. इतक्यांत आपल्या दाराशीं खालीं मोटार थांबली असावी असें त्याला वाटलें. त्याच्या मनांत उठायचें नव्हतें. पण एकदा पाहावेंच असें वाटून तो गच्चीवरून पाहातो, तों कोणी तरी बाईमाणूस उतरून आपल्याच बिऱ्हाडांत शिरल्याचें त्याला दिसलें. तो मागें फिरला आणि आपल्या जागेवर पुनः वाचीत बसला. जिन्यात पावलें वाजलीं. तो तिकडे नजर लावून पाहूं लागला. त्या दिवशींची तरुणी फिरून आली होती. चंद्रकांतानें उल्लसितपणें उठून तिचें स्वागत केलें व तिला आरामखुर्चीवर बसावयास सुचविलें. आज तिचा पोशाख त्यादिवशींच्यासारखा अगदींच साधा

नव्हता तिचा सगळा सरंजाम श्रीमंतास शोभण्यासारखा होता.

आगतस्वागताचे प्रश्न झाल्यावर त्या तरुणीनें अगदीं सरळपणें आपल्या येण्याचें कारण सांगून त्या लाल मण्याची गोष्ट सांगण्यास सुरुवात केली. चंद्रकांताला तरी त्या लाल मण्याच्या गोष्टीइतकें दुसरें काय प्रिय वाटणार? उत्सुकतेनें तो तिची गोष्ट ऐकू लागला.

"त्या लाल मण्याची गोष्ट सांगावयास आज मी मुद्दाम आलें आहें" ती तरुणी म्हणाली, "तुम्हांला सवड असल्यास—"

"हो हो. अगदीं भरपूर सवड आहे. आपण ती गोष्ट बोलूं लागा." अधीरतेनें चंद्रकांतानें म्हटलें.

"तो लाल माझ्या मामांच्या संग्रहींचा आहे. पण तो खरोखर पाहिल्यास एका राजवाड्यांतल्या जवाहिरखान्यांतला आहे. तो कोणकोणत्या राजघराण्यांतील कोणकोणत्या स्त्रीपुरुषांच्या हातांत शोभला असेल परमेश्वर जाणे!" ती जराशी थांबली.

चंद्रकांताचे डोळे विस्फारित होऊं लागले होते! ती तरुणी थांबल्यामुळें त्याचा फारच विरस झाला.

"माझ्या मामांचें नांव भय्यासाहेब!" ती पुढें बोलूं लागली.

"म्हणजे-ते पुराणवस्तुसंग्राहक भय्यासाहेब कीं काय? त्यांची आर्टिकल्स क्रॉनिकलमध्यें मी वाचीत असतों." चंद्रकांतानें विचारलें.

"होय-होय तेच-तेच माझे मामा." ती समाधानपूर्वक स्मितहास्य करून म्हणाली. माझ्या "मामांचे वडील व थोरले भाऊ दोघेहि मिलिटरीमध्यें मोठमोठ्या हुद्याच्या जागांवर होते व पेनशनर होते; आणि माझे मामादेखील मोठे हुद्देदार व पेनशनर आहेत. आपले मुंबईचे गव्हर्नर येथून जातांना आमच्या बंगल्यावर आले होते. ती त्यांची अगदीं खासगी भेट होती, म्हणून ती कोणासच समजली नाहीं व समजूं नये अशीच व्यवस्था मुद्दाम करण्यांत आली होती. आज किती तरी वर्षें माझ्या मामांनीं जुन्या मौल्यवान् वस्तूंचा संग्रह केलेला आहे. त्यांत कपडे, शस्त्रें, तसबिरी, नाणीं व रत्नेंहि आहेत. रत्नें फारच थोडीं आहेत. हा लाल मणि पण त्यांपैकींच एक आहे. मामा परवां गव्हर्नर साहेबांच्या सेक्रेटरींचें खासगी पत्र आल्यावरून पुण्यास गेले आहेत. पण जातांना त्यांनीं हा लाल जवाहिऱ्याकडे

नेऊन साफ करून घेण्याचें काम माझ्यावर सोपविलें होतें. काय असेल तें असो, पण ही लाल मण्याची आंगठी एकांडी ठेवणें त्यांना बरें वाटलें नाहीं, म्हणून त्यांनीं दुसरा एक तसलाच लाल विकत घेऊन थेट तशीच दुसरी आंगठी बनविली; आणि अशा प्रकारें त्यांनीं ही जोडी बनविली."

या ठिकाणीं ती तरुणी पुनः विश्रांति घेण्यासाठीं थांबली. चंद्रकांताची उत्सुकता परमावधीला पोंचली होती. तिला लवकर बोलती करावी म्हणून कीं काय नकळे, चंद्रकांतानें आश्चर्यानें विचारलें.

"जोडी बनविली का ? वाः ! छान !"

"हो--जोडी बनविली त्यांनीं. पण ती जोडी बनविल्यामुळेंच मी आज इतकी संकटांत सांपडलें आहे !"

"हें कसें ? आंगठ्यांची जोडी त्यांनीं बनविल्यामुळें आपण संकटांत कशा ?" चंद्रकांतानें विचारलें.

"तेंच आतां आपल्याला सांगणार आहें. पुण्याला जातांना त्यांची पुनः लहर फिरली वाटतं. ते म्हणाले, खऱ्या लालची आंगठी जवाहिऱ्याकडून साफसूफ करून ठेव आणि दुसरी नवीन बनविलेली जोडीच्या लालची विकून टाक."

"अस्सं ?"

"हो !" ती तरुणी म्हणाली. "त्याप्रमाणं मी केलं. पण नंतर मला आठवलं, कीं मी चुकून अगदीं भलतं केलं. दुसरी आंगठी साफसुफीला दिली आणि खरी आंगठी नकली आंगठीच्या भावानें विकून टाकली. आतां मामा आल्यावर माझ्यावर भयंकर प्रसंग गुदरल्याशिवाय राहायचा नाहीं. वाटेल तें करून ती आंगठी मला परत जागच्या जागीं नेऊन ठेवलीच पाहिजे. ती कोणत्याशा राजघराण्यांतील आंगठी आहे असें मामा म्हणत असत. ती त्यांना प्राणाहून प्यार आहे. तेव्हां आपण खर्चिलेल्या रकमेहून बराचसा फायदा घेऊन ती आंगठी-तो लाल परत द्याल तर माझ्यावर मोठे उपकार होतील." ती मुद्यावर येऊन म्हणाली आणि त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली.

ही गोष्ट आपण मुळींच ऐकली नसती तर बरें झालें असतें असें आतां चंद्रकांतास वाटलें. बाजू उलट आंगाशींच आली. तो लाल भय्यासाहेबांना जितका प्यार होता, त्याच्याहून कितीतरी पटींनीं तो आतां चंद्रकांतालाहि

प्यार वाटूं लागला होता. त्या तरुणीची ती मागणी मोडावी कशी ? आणि आपला आवडता लाल तरी हातचा सोडावा कसा ? चंद्रकांत गोंधळून गेला. त्याची ती चलबिचल ती तरुणी टक लावून सारखी पाहात होती, त्यामुळें तर तो फारच शरमला. पण त्यामुळेंच तो एकाएकीं चिडल्यासारखा झाला.

" आपण सांगितलेली गोष्ट मी ऐकली. पण आपलें नांव नाहीं समजलें अझून ! "

" माझें नांव शीलवती. "

" बरं–वाईट वाटूं देऊं नका–पण मला तो लाल कोणालाहि द्यावयाचा नाही. " तो अडखळत बोलत होता.

" मी आपणाला एक हजार रुपये इथल्या इथें मोजतें. मग तर झालं ?" ती सचिंतपणें खालच्या नजरेनें एका हातानें दुसऱ्या हातांतल्या बांगड्या फिरवीत म्हणाली.

तें दृश्य फारच मनोरम होतें. तो घोटाळ्यांत पडला. आंगठी कांहीं न घेतां देऊन टाकावी असेंहि त्याला क्षणभर वाटलें. पण तें क्षणभरच. त्याचा पूर्वीचाच निश्चय कायम ठरला. तिच्याकडे पाहिल्यावर त्याच्या मनांत कांहीं तरी नवे विचार–नव्या आशा उत्पन्न होत–तशा विचारांत असतांच तो तिला म्हणाला,

" हें पाहा, या जगांत पैसा म्हणजेच कांहीं सर्व नव्हे. हा लाल ज्याच्यापाशीं असेल त्याची इच्छा पूर्ण होते असें मला समजलें आहे. हं–ही समजूत खुळेपणाची आहे हे कबूल मला–पण पैशानें देखील मिळत नाहींत अशा गोष्टी आहेत ना या विचित्र संसारांत ? " तिच्याकडे सस्पृह रसिकतेनें पाहात त्यानें सगद्गद आवाजानें म्हटलें. " आपण मला क्षमा नाहीं का करणार ? आपण मला ही देणगी दिली असें मी आजपासून म्हणतों–"

" बरं–मर्जी आपली ! " असें निराशेनें म्हणून ती उठली आणि मागें न पाहातां चालती झाली. ती मोटरींत बसतांच मोटर सुरू झाली. मोटर दृष्टीआड होईतों चंद्रकांत तिकडेच पाहात होता. पण त्यानंतर देखील विचारतंद्रींत तो तसाच तिथें उभा होता.

: ४ :

पुनः आपण तिचा अपमान केला. या खेपेला तिनें आंगठीची–आंगठींतल्या

त्या रत्नाची आपणाला इतकी गरज कां लागली आहे हें समजावें म्हणून त्या मण्याचा पूर्वेतिहास सांगितला; तरी आपण पूर्वीइतक्याच निष्ठुरतेनें तिला विन्मुख करून परतून लाविली. हें कृत्य चांगलें केलें का? अशा प्रकारची विचारमालिका चंद्रकांताच्या मनांत कल्लोळ उठवून देत होती. शीलवती-सारख्या रूपगुणवती तरुणीला सुप्रसन्न ठेवावयाचें तर लालवर पाणी सोडायचें. तर शीलवतीच्या खुषी-नाखुषीची पर्वा करायची नाहीं. पण शीलवतीचा संतोष आणि लाल हीं दोन्हीं आपणाला न गमावणें अशक्यचां आहे काय?

अशा पेंचांत तो पडला होता. त्यानें शीलवतीच्याच तोंडून नुकतीच जी हकीगत ऐकिली होती, तिच्यामुळें तर तो लाल हातचा दूर करावयाचा नाहीं असा त्याचा पूर्ण निश्चय झाला होता. त्या मण्याला ऐतिहासिक महत्त्व आहे, तेव्हां तो आपल्या हातीं येण्यांत कांहीं विधिघटना तर नसेल असेंहि त्याला आतां वाटूं लागलें. कदाचित् त्याची किंमत आपण दिली त्याहून पुष्कळच पटींनीं अधिक असेल काय? जास्त होती हें तर खरेंच. निदान चारशें रुपये अधिक आतां शीलवतीच द्यायला कबूल होती. पण ही जादा किंमत लालची खरी किंमत म्हणून नव्हे, तर आपल्या चुकीच्या प्रायश्चित्तादाखल मोजावयास ती तयार झाली होती.

शेवटच्या विचारानें त्या लालची खरी किंमत काय असेल तें ठरवावें असें त्याला वाटलें. चंद्रकांतानें आपल्या बंधूला हांक मारून माणिकचंदाकडे पाठविलें. माणिकचंद चंद्रकांताचा फार परिचयाचा व मित्र गणण्याइतका सलोख्याचा होता त्याचाही रत्नपारख्याचा धंदा होता. तो शेजारींच जवळ राहात असे.

तो आल्यावर चंद्रकांतानें त्याला आपल्याकडचा लाल दाखवून किंमत विचारली. माणिकचंदानें तो वर, खालीं, कडें, मध्यें, पुढें, मागें, समोर करून निरखून पाहिलें आणि तोंड वाकडें केलें.

"काय?" चंद्रकांतानें आतुरतेनें विचारलें.

"याची कसली किंमत असावयाची आहे?"

"म्हणजे?"

"असेल पन्नास साठ रुपये फार झालं तर..."

"आं?"

"नाहीं तर?"

"मी त्याला सहाशें रुपये दिले!"

"फसलांत सपशेल!"

"पण आठशें–हजारापर्यंत दुसरे लोक मागताहेत त्याला."

"मागत असतील तर देऊन टाका. पण मला नाहीं वाटत असले खुळे लोक कोणी असतील म्हणून–पण असतीलहि. तुम्हीच आहांत कीं नाहीं एक...?"

"भले बहाद्दर! इथपर्यंत मजल आली म्हणावयाची! आपण रत्नपारखीच का–कीं गाजरपारखी—?"

"गाजर–पारखी म्हणाना! त्यांतहि वावगं नाहीं. आपल्या लालचीच मी पारख केली आहे. आणि तो लाल तर गाजराच्याच किंमतीचा आहे!"

चंद्रकांत विचारमग्न होऊन बसला होता. त्यानें थोड्या वेळानें माणिकचंदाच्या खांद्यावर हात ठेवून विचारलें. "भल्या माणसा! मला थोडी मदत करशील का?"

"काय बरें?"

"तुझ्या दुकानांतील जवाहिराच्या कांहीं निवडक वस्तु मला दोन दिवसांकरितां पाहिजेत. तसेंच तुझ्या ओळखीच्या एकदोन व्यापारी मित्रांच्या साह्यानें मला आणखीहि कांहीं वस्तु थोड्याशा वेळाकरितां मिळवून दे..."

"हा काय आहे विचार तुझा?"

"तो तुला सगळा मागाहून सांगेन." ते दोघेहि उठून आपल्या मित्राकडे जावयास निघाले. जातांना त्या दोघांचे सरखे बेत चालले होते.

संध्याकाळीं घरीं येतांनाच चंद्रकांतानें चित्रें, तसबिरी, रग, रत्नें वगैरे अनेक जिनसा आणून आपल्या बिऱ्हाडांतल्या एका खोलींत व्यवस्थितपणें आणून ठेवल्या आणि तो फिरावयास जाण्याकरितां म्हणून बाहेर पडणार, तोंच दरवाजांत त्याला सायकलवरून शीलवतीच येत असलेली दिसली. तो तिथेंच थबकला. शीलवतीनेंहि उतरून आपली सायकल त्याच्या बिऱ्हाडीं ठेवून देण्यास त्यास आग्रहपूर्वक सांगितलें आणि तिनें एका टॅक्सीवाल्याला खूण केली.

चंद्रकांत सायकल ठेवून बाहेर येतो, तों शीलवती मोटरींत बसली असून शेजारीं चंद्रकांताकरितां तिनें जागा राखून ठेविली होती. मोटर वाळकेश्वराच्या रस्त्याला लागली.

लवकरच त्यांनीं मोटरला रजा दिली आणि तीं दोघें पायींच चालूं लागलीं. चंद्रकांताला शीलवतीच्या या कृतीचा हेतु कळला नव्हता. तथापि त्याच्या मनांत रुजूं लागलेल्या आशा-बीजाला अंकुर फुटूं लागत होते. एक चांगलीशी जागा पाहून शीलवती बसली. चंद्रकाताला‌हि बसावें लागलें.

"चंद्रकांत!" शीलवती आपल्या पदराच्या टोकाला पीळ घालीत बोलूं लागली. चंद्रकांत ऐकत होताच; "हें पाहा, आज माझ्यावर मोठाच प्रसंग गुदरणार आहे."

याच्यापुढें ती बराच वेळ बोलली नाहीं. चंद्रकांतानेंच मग तिला विचारलें.

"कसला तो?"

"माझे मामा आजच आले आहेत. ते अतिशय कोपिष्ट आहेत. माझ्या हातून झालेली चूक एक दोन दिवसांत त्याच्या नजरेस आल्यावर ते मला कोणती शिक्षा करतील हें सांगवत नाहीं. मला कोणाचाच आधार नाहीं, म्हणून लहानपणींच माझ्या वडिलांनीं आपल्या देहावसानाच्या वेळीं त्यांच्या हवालीं केली. त्यांनीं माझा प्रतिपाळ चांगला केला. पण त्यांचा राग फारच भयंकर आहे. एकदोनदां अशाच कांहीं चुकामुळें त्यांचा माझ्यावर राग झाला होता. पण या खेपेस ते मला बिलकूल क्षमा करणार नाहींत. त्यांचा राग शात होईपर्यंत कुठं निघून जावं म्हणावं, तर आजपर्यंत मी दुसऱ्या कुणाच्याच घरीं राहिलें नाहीं. माझ्या ओळखीच्या तशा मैत्रिणी आहेत; पण परक्याच्या घरीं राहण्याइतकें माझें मन कोणाशींच कधीं मिळालें नाहीं. आणि आतां तर फारच भयंकर प्रसंग दिसतो. तो लाल जर तुम्ही मला परत दिला असता, तर माझ्यावर असा प्रसंग आला नसता. तुम्ही स्वभावाचे निष्ठुर दिसत नाहीं, पण याच बाबतींत कसे कठोर झालांत बरं? माझी तुम्हाला कांहींच करुणा येऊं नये काय?" असें म्हणून तिनें डोळ्यांस पदर लाविला. तिच्या डोळ्यांत अश्रु आले होते. चंद्रकांताचें मन विरघळलें. लालची गोष्ट कानीं पडतांच त्याचें विरघळलेलें मन पुनः निष्ठुर झालें. त्या लालची किंमत आपणाला वाटली त्यापेक्षां कितीतरी कमी आहे असें

माणिकचंदाकडून ऐकल्यापासून तर त्याला फार वाईट वाटलें होतें. पण त्यांत शीलवतीचा मुळींच हात नव्हता. तेव्हां तिच्यावर राग काढण्यांत काय फायदा? पण त्या लालची किंमत जर तो खरा लाल असला तर दोनअडीच हजार तरी आली पाहिजे, नाहीं तर त्याची किंमत ५० रुपयांहून मुळींच जास्त होणार नाहीं असें त्यास माणिकचंदानें सांगितलें होतें. तेव्हां त्या लालची येईल तितकी जास्त किंमत घेऊन तो भय्यासाहेबांनाच देऊन टाकावा, असा त्यानें निश्चय केला होता व त्या पुढील कपट-नाटकाची आगाऊ तयारीहि त्यानें करून ठेविली होती. तथापि शीलवतीला दुःख देण्यास आपण कारण झालों याबद्दल मात्र त्याला पराकाष्ठेचें वाईट वाटूं लागलें. त्यांतून तिला कसें पार पाडावें हेंच त्याला समजेना.

"मला फार वाईट वाटतें–" हे शब्द ऐकतांच शीलवतीनें वर पाहिलें. चंद्रकांताच्या चेहऱ्यांत विलक्षण फरक पडला असल्याचें तिच्या निदर्शनास आलें. पण तो कशाचा द्योतक असवा याचा तिला पत्ता लागेना. ती पाहातच होती. "अगदीं आरंभापासून आतां तुमच्याशीं झालेलें माझें वर्तन अगदीं अक्षम्य असें आहे. माझ्या त्या तसल्या वर्तनाची मलाच लाज वाटूं लागली आहे. जोंपर्यंत आपला परिचय घडला नव्हता, तोंपर्यंत मला त्याचें फारसें वाटलें नव्हतें. पण आतां आपल्या ठिकाणच्या सद्गुणसंभाराची ओळख होतांच मला काय करावें तें सुचतच नाहीं. तथापि मी आपणांला एक गोष्ट सुचवीन त्याप्रमाणें आपण कराल तर पाहा."

"सुचवा ना!" शीलवती म्हणाली.

"तुम्ही सगळा दोष माझ्यावर ढकलून मोकळ्या व्हा. लाल विक्रीला गेला. चूक तुमच्या हातून झाली. पण तो दोष माझ्यावर ओढून घेण्याची युक्ति मी पुष्कळ शोधून पाहिली, पण कांहींहि सांपडेना. तथापि मी तो मुद्दाम वरचढ घालून विकत घेतला आणि कितीहि रक्कम देऊं केली तरी दुराग्रहानें देत नाहीं, अशी गोष्ट तुमच्या मामांच्या मनावर ठसवून द्या. म्हणजे त्यांच्या रागाचा भार मी माझ्या शिरावर घेईन."

"तरी तो दोष माझ्यावर राहून त्यांचा कोप मला सहन करावा लागणारच" ती सचिंतपणें म्हणाली.

"आतां आठवली युक्ति" आठवल्यासारखें करून चंद्रकांत म्हणाला;

"तुम्ही असें करा. ती आंगठी विकावयास काढतांना तो लाल खोटा असल्याबद्दलची खात्री माणिकचंद जवाहिरे यांजकडून जातां जातां वाटेंत करून घेतली होती. त्यांनीं तो लाल बनावट असें सांगितल्यावरूनच तो मी छगनलाल मगनलालकडे विकला, असें तुम्हीं खुशाल मामांस सांगून द्या. माणिकचंद माझ्या ओळखीचे आहेत. मी त्यांना सांगावयाचें तें सारें सांगून टाकतों. इतकेंच नव्हे, तर माझ्याकडचा लाल तुमच्या घरीं जाईल अशी व्यवस्था करतों. परंतु तो पुनः मलाच मिळाला पाहिजे अशी माझी इच्छा आहे. तुमची या लालवर भक्ति नाहीं. तुम्ही फक्त मामांच्या रोषांतून मुक्त होण्याकरितांच तो मिळविण्याची एवढी खटपट करीत आहांत. तथापि माझा प्राण त्याच्यावर जडला आहे. तो लाल पुनः मला मिळाला नाहीं, तर माझें मस्तक फिरून गेल्याशिवाय राहणार नाहीं. इतका तो लाल माझ्या प्राणाशीं–माझ्या जीवनाशीं—निगडित झाला आहे."

"लाल सारखी निर्जीव वस्तु एखाद्याच्या प्रेमळ जीवनाशीं इतकी निगडीत होऊं शकते--हें एक नवलच म्हणायचं!" शीलवती संकटमुक्त होण्याच्या आशेनें आतां आनंदून म्हणाली.

"त्यांत आश्चर्य कसलं?" चंद्रकांत श्वास सोडून म्हणाला, "माझ्या जीवाशीं निगडित होणारी सजीव पुतळी तरी मला कुठली आढळायला? आणि तशी हिरकणी मिळत नाहीं तोंपर्यंत तो लालच मला प्यारा वाटणार?

"हं! अस्सं! बरं तशी जिवंत पुतळी मिळालीच तर तिची बिचारीची दैनाच व्हायची. कारण आपला जीव असायचा त्या लालवर."

"पण त्या गोष्टी आतांच कशाला पाहिजेत? आतां आपण जाऊं." असें चंद्रकांतानें म्हटल्यावर तीं दोघें उठलीं आणि बोलत बोलत चंद्रकांताच्या बिऱ्हाडापर्यंत आल्यावर आपली सायकल घेण्याकरितां शीलवती चंद्रकांताकडे आली. त्यानें तिला माडीवर यावयास सांगितलें. अर्थात् आपला नवीन वस्तुसंग्रह तिला दाखवावयाचा त्याचा हेतु होता. तो पाहून ती चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागली.

त्याला फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. भय्यासाहेब–शीलवतीचे मामा–मोटरींतून उतरून वर चढले. चंद्रकांताचा भाऊ त्यांना वर घेऊन आला. चंद्रकांतानें त्यांचें प्रेमळपणें स्वागत केलें. भय्यासाहेब चंद्रकांतावर

अत्यंत खूष होऊन गेले. फराळाचें वगैरे झाल्यावर चंद्रकांतानें आपला वस्तुसंग्रह त्यांना दाखविला. वस्तुसंग्रह पाहून तर भय्यासाहेबांना फारच आनंद झाला. त्यांत एक लाल मण्याची आंगठी त्यांना हुबेहुब आपल्याच आंगठीसारखी आढळली. ती निरखीत भय्यासाहेब बराच वेळ स्तब्ध राहिले. " ही कुठून आली आंगठी तुमच्याकडे ? " भय्यासाहेबांनीं कुतूहलानें विचारलें.

" ती आंगठी उदेपूरच्या राजघराण्यांतली आहे," लालजी म्हणाले, " माझ्या वडिलांचा जवाहिऱ्याचा धंदा होता. मोठमोठे संस्थानिकदेखील त्यांच्याशीं देण्याघेण्याचा व्यवहार करीत असत. आम्ही उज्जनीस राहात असूं. त्यांच्या वेळच्या या वस्तू मी सर्व जपून ठेविल्या आहेत. मी आतां इथें नोकरीस असतों. पण या वस्तु मी फार जपून ठेविल्या आहेत. आपले कांहीं लेख मी क्रॉनिकलमध्यें वाचले आहेत. आपण आज गरिबाच्या घरीं येण्याची तसदी घेतलीत, याबद्दल मी आपला उपकृत झालों आहे."

" छे ! छे ! तसं म्हणायला नको कांहीं. मला या विषयाची फार आवड. आणि तुमचाहि तोच आवडीचा विषय. त्यामुळें आपली जमलेली ओळख कायमची व्हावी असं मला वाटूं लागलं आहे. असलीच एक आंगठी कांहीं दिवसापूर्वी नजरचुकीनें आमच्या भाचीच्या हातून विकली गेली. ती ज्यानें घेतली, त्याचा पत्ता नीट मिळेना. माणिकचंदनीं ती पाहिल्याचें समजलें. पण चौकशी केल्यावर समजलें, कीं माणिकचंद रंगूनला गेले आहेत, ते एकदोन महिने मागें परतावयाचे नाहींत. ती आंगठ्यांची जोडी होती आणि आतां-तर विजोड झाला. ती आंगठी मला ठेवावयाची नव्हती, पण ही पाहिल्यापासून वाटूं लागलं, कीं पुनः जोडी जमवून ठेवावी. तेव्हां—"

" काय ? " चंद्रकांतानें विचारलें.

" ही आंगठी आपण मला विकत द्याल काय ? "

" छे, छे ! मी ही आंगठी विकणार नाहीं. "

" पण किंमत काय आहे हिची ? "

" हिची किंमत तीन हजारच्या मानानें असेल असें वडील म्हणाल्याचें मला आठवतें. "

" एक हजारापर्यंत द्याल तर मी घेईन. "

"पण मी कांहीं व्यापारी नव्हे. आपणांला पाहिजे असेलच, तर अशीच घेऊन जा."

"छे, छें मला मोफत नको. मला फुकट घ्यायची नाहीं ती आंगठी. आपण नाखूष होत असाल तर मी दोन हजार रुपये देतों."

"आतां आपला परिचय जमलाच आहे. आपण तो दृढ करूं इच्छितां, तर या स्नेहभावाच्या ठिकाणीं क्रयविक्रयाची भाषा पाहिजेच कशाला, असं माझं म्हणणं."

"इतका गोड स्वभाव मीं कधीं पाहिला नाहीं. तथापि–बरं–फूल ना फुलाची पाकळी–पण–बरं! असं करा, आपला फोटो मला द्याल का? आंगठी मी उद्यां नेईन–आणि तिच्या किंमतीचेंहि काय तें पाहातों. इथल्या मंडळी-शिवाय गांवीं आपली मंडळी कोणी नाहींत वाटतं?"

चंद्रकांतानें आरंभींच आपली सर्व माहिती त्यांस कळविली होती. त्यांनीं विचारलेली आणखीहि सर्व माहिती त्यानें त्यांना सांगितली. शेवटीं भय्या-साहेबांनीं त्याचा फोटो त्याच्याकडे मागितला. तोहि त्यानें त्यांच्या हवालीं केला. त्यांचा फोटो त्यांच्याकडे मागावयास मात्र तो विसरला नाहीं.

"पाठवीन–पाठवीन बरं," जातां जातां ते म्हणाले "एकाच्या ऐवजीं दोन पाठवीन बरं!" असें म्हणत व स्वतःशीं हसत ते निघून गेले. त्यांना रस्त्यापर्यंत पोंचवून चंद्रकांत मागें परतला. भय्यासाहेब घरीं आले ते फार खुषींत असल्याचें दिसून आलें.

आल्याबरोबर त्यांनीं शीलवतीला बोलाविलें. ती मामा काय बोलतात तें ऐकावयास तयारच होती.

"शीले! केवढा घोटाळा केलास तूं! त्या चंद्रकांताचा मी पुष्कळ शोध केला. छगनलाल मगनलालकडे देखील विचारलें. पण त्याचा कुठं पत्ता लागेना. आपला लाल ज्यांच्याकडे धुवायला दिलास, त्यांचं दुकान बंदच आहे. कोणी तरी त्यांचा नातेवाईक वारल्यामुळें ते गांवीं गेले आहेत. तूं दिलेल्या पत्त्यावर लालजी देशपांड्यांच्या बिऱ्हाडीं मात्र गेलों आणि त्यांचा संग्रह पाहिला. फारच छान गोड माणूस आहेत ते लालजी देशपांडे. मला त्यांच्याशीं झालेला स्नेह कायम करावयाचा आहे. मला हवा तसलाच लाल त्यांच्याकडे आहे व तो दोन हजारांस घ्यायचा मी ठरविलं आहे–हें काय

हें ?" त्यांनीं मध्येंच विचारलें.

कारण भय्यासाहेबांना आपल्या चुकीमुळें दोन हजारांचा खर्च पडला म्हणून शीलवतीनें आपल्या बांगड्या आणि कुड्या काढून त्यांच्यासमोर ठेविल्या होत्या ! मागाहून तिनें हातांतील आंगठीहि काढून दिली.

"माझ्या चुकीमुळें आपणाला हा खर्च पडला ना ? यांतून थोडासा हिस्सा तरी सध्या त्या रकमेचा भागवतां येईल."

"आतां ठेव ते तुझ्याकडेच; मग पाहूं त्यांचें, आणि हें पाहा,—" भय्यासाहेब कांहींसें कागदांतून काढीत म्हणाले–" हें पाहा–शीले ! इकडे ये. तूं कांहीं आतां लहान नाहींसच. मी तुझ्याकरितां पुण्यास गेल्यावेळीं सुद्धां एक दोन ठिकाणें साधारण न्याहाळून ठेवलीं आहेत. पण आजचें हें स्थळ माझ्या मनांत विशेषच भरलें आहे. पणं तुझ्या पसंतीशिवाय काय उपयोग ? हें बघ—हा फोटो तुला कसा काय आवडतो ?"

"कुणाचा हा ?" हातांत घेऊन निरखून पहात शीलावतीनें विचारलें.

"त्याच लालजींचा."

"मला काय आवडायचं आहे त्यांत ?" नापसंती दाखवीत शीलवतीनें म्हटलें.

"म्हणजे तुला पसंत नाहीं वाटतं ? ठीक आहे. एवढ्यावरच झालं नाहीं. उद्यां सकाळीं दोन हजारांच्या नोटा आणि माझं पत्र घेऊन त्यांच्याकडे जरा जाऊन ये. तिथं त्यांचा प्रत्यक्ष परिचय होईल, आणि मग मी त्यांना इथं बोलवीन."

"माझ्या पसंतीनापसंतीचा प्रश्न राहूं दे बाजूला. आपण सांगाल त्याप्रमाणं ऐकणं हें मी माझं कर्तव्य समजतें. पण आपलं म्हणणं मी ऐकलं तर माझा एक हट्टहि आपण पुरवला पाहिजे."

"काय–काय–तो ?"

"मी आपणांकडे असलेली एक वस्तु मागेन ती दिली पाहिजे."

"अवश्य देईन. मग तुला हा फोटो पसंत आहे ना ?"

"आपली आज्ञा मला केव्हांहि मान्यच आहे. तथापि आपली इच्छाच असेल तर सकाळीं जाऊन येईन मी तिथं !"

❖ ❖ ❖

चंद्रकांताला दोन हजार रुपये रोख मिळाले आणि लवकरच वाङ्‌निश्चयहि झाला. चंद्रकांतानें माणिकचंद व इतर स्नेही यांजकडून जमविलेल्या साऱ्या वस्तु देऊन टाकल्या. लग्न झाल्यावर चंद्रकांताला आंदणादाखल तो लाल शीलवतीनें आपल्याबरोबर आणून चंद्रकांतास अर्पण केला हें सांगावयास नकोच. भय्यासाहेब 'हल्लींच्या तरुणांचे हे वयस्कांस फसविणारे खेळ पाहून आपण तर पुरे स्तंभित झालों' अशा अर्थाचे उद्गार काढीत असतात.

एकंदरींत लालच्या जोडीला पोवळ्यांची जोडीहि चंद्रकांताला मिळालीच

⁂ ⁂ ⁂

आणि नवलाची गोष्ट अशी, कीं भय्यासाहेबांचे जवाहिरे रंगूनच्या फिरतीवरून आले व त्यांनीं घेतलेला लाल भय्यासाहेबांकडे परत केला, तेव्हां तो त्यांचा खराच लाल असल्याचें भय्यासाहेबांस व शीलवतीस समजून आलें. विकलेला लाल तो शीलवतीच्या समजुतीप्रमाणें खरा लाल नसून खरोखरीच खोटा लाल होता.

# पोटगी

' अयाई—आः—आय्!'

कण्हण्याचा स्वर ऐकून एक तरुणी न्हाणीघरांतून आजाऱ्याच्या खोलीकडे जाण्यासाठीं भांडीं घासण्याचें बंद करून हात धुवूं लागली. लगबगीनें हात धुवून ती आजाऱ्याच्या खोलीच्या उंबरठ्याशीं आली, तोंच मागच्या मागें तिला बाजूस करून दुसरीच एक सरासरी बावीस वर्षांची स्त्री खोलींत शिरली !

आणि तितक्यांतच एका पन्नास वर्षांच्या पोक्त विधवेनें झट्दिशीं तिथें येऊन तिला मागील दारास हातास धरूनच म्हणजे जवळ जवळ ओढल्या-सारखेंच नेलें !

" सूनबाई !' ती पोक्त स्त्री हुकमी पण हलक्या सुरांतच म्हणाली, 'लवकर यशोदाबाईकडे जा आणि अण्णाच्या औषधासाठीं आल्याची एक फडा घेऊन ये जा. औषध आल्याच्या रसांतून द्यावयाचं आहे. तूप घरांत आहे; पण आलं संपलंय्. धावतच जाऊन ये.'

सूनबाईशीं असें बोलत असतांना तिची मुद्रा मात्र चौकस व तिचें सारें लक्ष रोग्याच्या खोलीकडे लागलें असल्याचें स्पष्ट दिसत होतें. त्या खोलींत कांहींतरी बोलणें चाललें होतें व तें ऐकण्याकडे तिचे कान लागले असावेत.

त्या तरुणीच्या मुखावर खिन्नतेची छाया पसरली. जागच्या जागींच ती क्षणभर थांबली ! आपल्यावर सोंपविलेली कामगिरी ही खरोखरच आवश्य-कतेची आहे, कीं आपणांला आजारी माणसापासून दूर करण्याकरितांच निर्माण केलेली सबब आहे, याबद्दलची शंका तिच्या हळव्या मनाला चाटून गेली ! कांहीं झालें तरी तिला तेथून निघून जाणें भागच होतें. ती यशोदाबाईकडे जावयास निघाल्याचें पाहून मागील दार बंद झालें आणि ती पोक्त बाई आजाऱ्याच्या खोलीबाहेरच किंचित्काल कानोसा घेत राहिली. आंत दोघांचें बोलणें चालू होतें.

आजाऱ्याचा स्वर क्षीण आणि त्रासिक होता.

'पण ती कां नाहीं आली ? आहाय, अं ?

'ती उफाड्यावरची ! नुसती मुसमुसते...तिला का तूं आवडतोस असं तुला वाटतं ? लग्न झाल्यापासून तिनं कधीं माहेर सोडलं काय ? बरं, तूं मुंबईहून आल्याबरोबर तरी ती कधीं इकडे उत्कंठेनं आली आहे ? सतरा निरोप नि पंधरा गडी पाठवावे तेव्हां येते हातपाय आदळीत. तूं असा हांक मारतोस, पण ती गेली असेल शेजार फिरायला. घरांत पाऊलच नाहीं टाकायचं !' डोकें चेपीत असतांच वारुणी आपल्या बंधूशीं बोलत होती. आपल्या बोलण्याची खात्री पटावी म्हणून बसल्या जागेवरूनच तिनें आपल्या चुलतीस हांक मारली—

'काकी ! वहिनी आहे का ग घरांत ?'

'ती सकाळींच उठून गेली असेल शेजारीं—नाहींतर पहांटेच्या पूर्वींच गेली असेल—' न्हाणीघरात लगबगीनें जाऊन सूनबाईनें घांसून ठेवलेल्या भाड्यांवरून हात फिरवीत व त्यांचा आवाज काढीत काकीनें उत्तर दिलें, 'मी भांडीं घांसतें आहे ग वारू ! आलंच पाहिजे का ?

'ऐकलंस ना अण्णा ? काकीला या घरकामापुढं तुझ्याजवळ यायला देखील सवड होत नाहीं. मी घर सोडून इथं माहेरला वर्षाचे बारा महिने कशी बरं राहूं ? काका गेल्यापासून तर घरांत एकटीच काकी. तूं अन् मी दोघंच ना तिच्या जिवाला आधार ? आतांशा तर घरदार सोडून स्वारी देखील इथंच आली काकीकरितां. काकीनं तरी आपणांला चुलत्याच्या मुलांसारखं वागवलं आहे का ? अगदीं पोटच्या मुलांसारखं वागवलं. म्हातारपणांत जर तिला आमचा आधार नाहीं मिळाला, तर काय उपयोग आमच्या जिण्याचा ? तुला एकदां बरं वाटलं, कीं देव पावला. मी देवाला नवस देखील केला आहे, खणानारळाच्या ओटीचा—'

'अयाः—आः !' रोग्यानें कण्हत असतांना किंचाळल्यासारखें केलें.

'अण्णा ! असं रे काय करतोस ? काकी-काकी, बघ ग अण्णा कसं करतो तें ?' वारू ओरडली.

काकी आंत येऊन पाहाते, तों अण्णा निःश्चेष्ट पडलेला ! दोघीही घाबरून गेल्या. वारू तर रडूंच लागली. काकीही रडकुंडीस आली. तोंच पुढील

दारावर थाप ऐकूं आली. काकीनें जड हातांनींच दार उघडलें, तो वारूची 'तिकडची स्वारी' व बरोबर तिघेजण परकी माणूस अशी मंडळी आंत आली. काकीनें त्यांना बसण्यास मानेनेंच सुचाविलें व घरांतून दूरवर नजर टाकून तिनें एकवार पाहिलें. सूनबाई येते कीं काय हें पाहाण्याच्या हेतूनें तिनें ती चौफेर नजर फेकली होती. सुनबाईस इतक्या लवकर येतां येऊं नये अशी तजवीज तर तिनें आगाऊच करून ठेविली होती.

पण सूनबाईच्या जिवाची स्थिति किती अनुकंपनीय झाली होती! आलें आणायला जायला सांगितलें तेव्हांच तिच्या मनांत जायचें नव्हतें; म्हणूनच ती थबकली. पण औषध तरी नवऱ्याकरितांच ना? अन् तें आणायला नाहीं कसें म्हणायचें? तिला काकीची आज्ञा मोडणें शक्यच नव्हतें. पायांवरचे जुनेराचे ओंचे डाव्या हातांत घेऊन घाईघाईनें जाण्यास पाऊल उचललें आणि तिच्या मनांत अंदेशा आली.

तिला वाटलें नवऱ्याच्या मनांतून आपणाला जवळ बोलवावें असें आहे. पण वारू आणि काकी आपली मांठ पडूं देत नाहींत. रात्रौ सक्त पहारा! खोलीच्या दारावरच दोघींचीं अंथरुणं! आत्तांचं नवऱ्याचं कण्हणं आपल्याकरितांच होतं. पण आलं आणण्याचं काम तितक्यांत निघालं! आलं आणल्यावर तरी खोलींत जायचंच अन् आपल्या हातांनीं कपाळ न् पाय चेपायचे.

ती झपाझप यशोदाबाईकडे गेली, तों यशोदाबाईनीं इकडल्या तिकडल्या गप्पाच सुरू केल्या. मग तिच्या घरांतील माणसांबद्दल व खुद्द नवऱ्याबद्दल अनेक प्रश्न विचारले. मग पावटे सोलावयाला तिला हात लावायला सांगितलें. मग आलें खणायला म्हणून ती गेली. तें खणायच्या कामालाच अर्धा तास! बिचारी सूनबाई तेथेंच अडकून पडली!

आणि काकीला हें सर्व असें घडायचें हें ठाऊक होतेंच. तिच्या मानेची खूण पाहून आलेल्या मंडळींनीं छत्र्याकांठ्यांचा आवाज न करतां त्या हळूच ठेवल्या. पायांतल्या वहाणांचा देखील आवाज होऊं दिला नाहीं. डोकीचे रुमाल व अंगांतील कोट त्यांनीं खुंटीला अडकावले. एकानें एकच खुर्ची होती ती अडविली. दोघे चौफळ्यावर बसले; आणि आप्पा–म्हणजे वारूबाईची तिकडची स्वारी–चिलमींत घालण्याकरितां तंबाखू नखांनीं खुडूं

लागले. नंतर ती चिलीम त्यांनीं गुडगुडीवर ठेवून विस्तवाला फुक मारली. धूर निघूं लागतांच त्यांनीं स्वत: गुडगुडी ओढून नंतर ती बाकीच्या दोघांस दिली. काकीनें पाण्याचे तांब्रे आणून ठेवलेच होते. सर्वांनीं पाय धुतले.

'वैद्य इतक्यांत येतील!' घरांतली परिस्थिति काकीच्या मुद्रेवरून ओळखून आप्पांनीं सूचना दिली.

आणि तितक्यांतच वैद्यबुवा येऊन रोग्याच्या खोलींत गेले. वैद्यबुवांचा चेहरा खोलीच्या बाहेर पडतांना उतरलेला दिसला. वैद्यबुवा आप्पांच्या कानाला लागले आणि मात्रेचे वळसे देण्यास सांगून निघून गेले.

'आतां शुद्धि येईल, त्याच वेळेस तुम्हांला काय करावयाचें तें करून घ्या' येवढीच सूचना देऊन वैद्यबुवा निघून गेले.

वैद्यबुवा निघून गेले! पण चार पावलें चालतात, तोंच त्यांना समोर जें माणूस दिसलें त्याच्याकडे पाहून त्यांनीं मान फिरविली आणि दुसरीकडेच पाहात त्यांनीं बाजू घेतली!

ती सूनबाईच आलें घेऊन येत होती. वैद्यबुवांना पाहिल्याबरोबर त्यांना एका बाजूस गांठून रोगाबद्दल व रोग्याबद्दल खरीखुरी माहिती काढून घ्यावी असा विचार तिच्या मनांत चट्कन् आला. पण कोणत्या नांवानें कशी हांक मारावी असा विचार करीत असतांनाच वैद्यबुवा दृष्टीआडदेखील झाले. मोठ्यानें हांक मारणेंआतां शक्य नव्हतें. घरापाशींच ती येऊन ठेपली होती.

मागच्या दारानें ती घरांत आली व आलें आणून तिनें काकीजवळ दिलें. आतां आपण वाटेल तें करून रोग्याच्या खोलींत प्रवेश करावयाचाच असा तिच्या मनांत बेत ठरत असेल नसेल, तोंच रोग्याच्या खोलीचें दार आंतून बंद करून घेण्यांत आलें! बिचारीचा नाइलाज झाला!

अण्णा मुंबईहून यावयाच्या पूर्वीं थोडे दिवस घरची परवानगी घेऊन ती माहेरीं गेली होती. अण्णा जीर्णज्वरानें आजारी पडून व अस्थिपंजर होऊन आले व सरासरी वीस पंचवीस दिवस झाले तरी वत्सलेला घरून कांहींच हकीकत कळविण्यांत आली नव्हती. अण्णाची स्थिति अत्यवस्थ झाली व अण्णानेंहि तिला आणविण्याचा हट्टच धरला तेव्हां तिला आणली; पण तिची व अण्णाची कधींहि गांठ पडूं दिली गेली नाहीं.

दाराला आंतून कडी लागली व लगेच अण्णाचे रागाचे उद्गार

वत्सलेच्या कानीं आलें.

'घरांतून बाहेर काढा सटवीला! बारा महिने माहेरीं आणि कधीं आलीच घरीं तर शेजारीं! हांक मारली तर 'ओ' देखील देत नाहीं; समोर देखील येत नाहीं; असली अवदसा घरांत आणली आणि फसलों!–अयाई–आयू–गऽऽऽ' आवेशानें बोलल्यामुळें मस्तकास व छातीस त्रास होऊन अण्णास जोराच्या वेदना उठल्या.

'बघितलंस सुने!' काकी वत्सलेस म्हणाली, 'तिकडे समोर जाऊं नकोस म्हणून तुला कितीदां सांगितलं? वैद्यांचं मत काय तें तुला पूर्वींच नाहीं का सांगितलं होतं? असल्या आजारांत नवराबायकोची गांठ पडतां नये. तसं झालं तर औषध तर लागूं व्हायचंच नाहीं; पण त्या औषधाचा उलट परिणाम मात्र झाला तर होईल.'

'त्यासाठींच तर मी तिकडे जवळ गेलें नाहीं. पण आतां या आजारांत डोकं, पाय चेपायला मला जवळ जाऊं द्या!' वत्सला रडत म्हणाली. तिला जें म्हणायचें होतें तें ती स्पष्ट कसें म्हणूं शकली असती? तसें म्हणणें अपशकुनीपणाचें झालें असतें.

'इश्श ऽ ग बाई! तुम्ही हल्लींच्या मुली अशाच ग चवचाल! म्हणे जवळ जाऊं द्या!' काकी रागांत पण हलक्या आवाजांतच तांदूळ रोवळींत ओतीत म्हणाल्या, "अग तुझा नवरा तो दुसरीचा का कुणाचा होतो आहे? मेला इतका लुब्रेपणा करायला लाज नाहीं कशी वाटत? मनाची नाहीं तरी जनाची तरी! इश्श ऽ–" शेवटच्या शब्दावर उठतां उठतां व स्वैंपाकघरांत फणकाऱ्यानें जात असतां झटक्याचा जोर पडल्यामुळें त्याला एक निराळयाच तऱ्हेचा उठाव मिळाला होता. पण तो उठाव वत्सलेच्या प्रेमपूर्ण व संत्रस्त हृदयाला उरावर पडलेली धोंड असावी तसा भासला.

वत्सला मागील दारास जाते, तों वारू–वन्सचे शब्द तिच्या कानीं पडले. 'अन् अण्णा, ती सटवी माळ घालून घरांत आल्या दिवसापासूनच तुझ्या पाठीमागं आजारीपण लागलं आहे. कोणत्या मुहूर्तावर ही अवदसा घरांत शिरली, देव जाणे! मेलीचा पायगुणच वाईट! दुखणं घेऊनच घरांत आली! असं बोलूं नये, पण येतंच तें हिशेबाला—'

'या माझ्या शेवटच्या आजारांत तरी ती आपल्या धर्माला जागेल असं

मला वाटलं होतं. पण–आयाय् !'

'अण्णा ! बोलूं नको– डोक्याला त्रास देऊं नको– पुन्हां घेरी यायची एकाद वेळेस ! आणि असं 'शेवटचा आजार' असं कांहीं वेडंविद्रं बोलूं नकोस, अण्णा ! बघ मला कसं रडूं कोसळतं !' वारू वन्सं डोळ्यास एका हातानं पदर लावूं लागल्या. दुसरा हात अण्णांचं डोकं चेपीत होता.

आणि वारूवन्संचे पतिराज हातांत कागद व पेन्सिल घेऊन बरोबर आणलेल्या तिघां सहकाऱ्यांच्या संगनमतानें कांहींसें टिपण करीत ओस्र्यावर बाहेर बसले होते. काकीचा कान मुख्यत्वेंकरून तिकडेच होता. मधून मधून ते उठून घरांत येत असत, काकीच्या कानाला लागत व पुन्हा कागदावर खोडाखोड करूं लागत.

वत्सलेनें भांडीं धुवून घरांत आणून ठेवलीं. आजाऱ्याच्या आंगावरचे व अंथरूणापांघरूणाचे कपडे धुणावळीकरितां खोलीच्या बाहेर पडले होते. ते घेऊन धुऊन आणावयाचा हुकूम काकीनें सूनबाईस केला ! एका दुःखातिरेकाशिवाय कोणतीच संवदना वत्सलेच्या हृदयास होत नव्हती. तिचें मन, हृदय आणि शरीर हीं बधीर झालीं होतीं. पडद्यावरच्या हालत्या निर्जीव चित्रासारखी तिच्या फक्त शरीरावरचीच तेवढी हालचाल होत होती व तीदेखील मेस्मेरिझमच्या प्रयोगाखालीं असलेल्या कुडीसारखीच हुबेहूब !

बिचारी वत्सला घराबाहेर निघाल्याबरोबर आजाऱ्याची खोली उघडली गेली. वारूवन्सं बाहेर आली. मात्र घराच्या एका काळोख्या कोपऱ्यांत तिची आणि तिच्या पतीची थोडीशी कानगोष्ट झाली. कारण आप्पा, वारू खोलींतून बाहेर केव्हां येतें इकडे टक लावूनच बसले होते. कानगोष्ट झाल्याबरोबर आप्पा पुन्हा आपल्या सहकाऱ्यांशीं संगनमत करूं लागले.

अण्णाला आतां दुसऱ्यांदा घेरी आली होती. ते निश्चेष्ट पडले होते. काकी मात्रेचे वळसे उगाळीत होत्या.

आणि आप्पांनीं कसलासा एक लांबलचक मसुदा लिहून काढला होता. त्यांतील महत्वाचा मजकूर काकींना ते वाचून दाखवीत होते. काकींचें लक्ष त्या मजकुराकडे वेधलें होतें. त्यामुळें वैद्यानें ज्या मात्रेचे फक्त चारच वळसे रोग्याच्या औषधांत उगाळावयास सांगितले होते, तिचे वळसे बारा, सोळा, वीस होऊन गेले तरी तें लक्षांत येण्यासारखी मनःस्थिति कोणाचीच नव्हती.

अण्णाला आतां शुद्धि आली होती.

' काकी ! ती कुठं गेली ग ? '

' शेजारच्या यशोदाबाईच्या घरीं. तो तिचा वासू हल्लीं आला आहे घरीं कॉलेजांतून–'

' पण तिला पांच मिनिटांसाठीं जरा बोलावून आण बघूं ! '

' मीं मघाशींच बोलवायला माणूस पाठविला, पण–'

' पण काय ग काकी ? ' वारूवन्सं मानभावीपणानें मध्येंच पडून म्हणाली, ' भलतीसलती वांकडी कल्पना आणावीच कशाला माणसानं मनांत ! वासूकडून ती सिनेमांतली गाणीं शिकते ना आतांशा ? वासू म्हणे लवकरच सिनेमांत जाणार आहे. तो कसलीशीं गाणीं शिकवतो आतांशा वहिनीला. आणि तीं चित्रंहीं दाखवतो तिला. आमच्या वहिनीचा गळा तसा गोड आहे. बसली असेल गाणीं म्हणत. दोनदां बोलावलंस तसं आणखी दोनदां बोलाव; म्हणून काय सदान्‌कदा ' शेजारीं गेली, शेजारीं गेली ' असं सांगायचं ? सासूलाच सुनेला कसं सांभाळून घ्यायचं तें आधीं कळलं पाहिजे. '

या विषारी मलमपट्टीनें नाजूक भावाच्या घावावर जो परिणाम करावयाचा तो केला. अण्णा चांगलेच शुद्धीवर आले होते. आप्पांनीं एक कागद सहीकरितां आण्णासमोर आणला. वारूनें लेखणी बुडवून ती अण्णाच्या हातांत दिली.

अण्णानें माननेंच प्रश्न केला.

' आपण मृत्युपत्र करून ठेवण्याचा विचार मागें बोलून दाखविला होता ना ? तेंच हें सहीकरितां आणलें आहे. ' आप्पानीं खुलासा केला.

' मजकूर तुम्हीं सांगितल्याप्रमाणेंच आहे. आम्ही सह्या केल्यात साक्षीदार ह्मणून–' एक साक्षीदार बोलला.

' तिची काय व्यवस्था लावली ? ' अण्णांनीं विचारलें.

' तिला पोटगी दिली आहे पुरेशी ! आणि इस्टेट सगळी हयातीपर्यंत काकीनं मालकपणीं भोगावयाची व तिच्या पश्चात् वारूनं सेवा केल्यामुळं वारूनं भोगावयाची व तिची विल्हेवाट तिनं मालकपणीं करावयाची. '

काकीनें इतक्यांतच अण्णाला औषध दिलें. अण्णांनीं सही केली.

'अर्रर्र ! अहाय–अयायू ग ऽ' अण्णा किंचाळले. 'भडका उडाला ! अंगाचा वणवा पेटला ! कपाळाच्या चिंधड्या उडाल्या रे देवा ऽ आ–आय् !–' '

अण्णा तडफडूं लागले आणि लवकरच त्यांच्या तोंडांतून लाळेचा लोट बाहेर पडूं लागला ! कांहीं वेळानें विव्हळणें थांबलें.

काकीनें व वारूनें आप्पांना एकीकडे घेऊन अधीरपणानें विचारलें,

'त्या कार्टीला पोटगी पुरेशी दिली म्हणून वाचलंत ना ?'

'होय !' आप्पा म्हणाले.

'म्हणजे मघाशीं काय ठरलं होतं तर ! पुरेशी म्हणजे किती ?'

'तुमचं उत्पन्न दरसालचं एक हजार रुपयांचं आहे ना ? तिला पोटगी म्हणून दरमहा भात द्यावयाचं ठरवलं आहे. त्या भाताची किंमत सरासरी दरमहा दीड किंवा दोन रुपये होईल.'

'अगबाई ! इतकी पोटगी फुकटच्या फुकट माहेरीं बसून ?' वारू म्हणाली.

'पण तिचे सगळे दागिने काकींच्याकडून तुझ्याकडेच आले आहेत ना ?' आप्पांनीं विचारलें.

'म्हणून काय झालं ?'

'आणि कागदांत लिहिलेली पोटगी देणं न देणं हें आपल्याच हातांत आहे कीं नाहीं ? खुळ्या कुठल्या !'

दोघींचीही समजूत पटली आणि त्या आतां रडण्याकरितां म्हणून तयार होऊन आजाऱ्याच्या खोलीकडे गेल्या.

आणि त्याच वेळीं बिचारी वत्सला धुणीं धुऊन तीं पाटींत भरून लगबगीनें घराकडे यावयास निघत होती. आज रात्रीं तरी अण्णांची भेट घेऊन गैरसमज दूर करावयाचाच असा निश्चय ती आपल्या मनाशींच करीत होती. तिनें टोपली उचलली आणि जवळच एक कुत्रें भेसूरपणें रडावयास लागलें. तिचें मन चरकलें आणि काळजांत धस्स झालें !

# शेठजीचें लटांबर

“हो हो ! पत्रच लिहा, बेलाशक पत्र लिहा.”

“पत्रच लिहितें. तोच नमुना बरा ना ?”

“पत्रच लिहा. कांहीं हरकत नाहीं. सुरुवात होऊंदे लेखनाला.”

असें म्हणून विद्याधरांनीं आपल्या रिटवॉचमध्यें साडेदहा झालेले पाहातांच झटपट जिना उतरून ऑफिसच्या मार्गाकडे मोर्चा वळविला.

विनोदिनीहि जिन्यापर्यंत त्यांच्या मागोमाग गेल्या. त्यांचें मन विचारांतच गढलेलें होतें. विद्याधर दृष्टीआड होईपर्यंत त्या तिथें उभ्या होत्या. त्यांच्या नजरेंत विद्याधरांबद्दलची पूज्यबुद्धि प्रतिबिंबित झालेली होती. विद्याधर दृष्टीआड झाले तरी त्या शून्य दृष्टीनें त्याच दिशेकडे पाहात त्याच जागीं किती वेळ तरी उभ्या राहिल्या. त्यांच्या मनांत विचारांवर विचार येत असले पाहिजेत यांत शंकाच नाहीं. पण ते किंचित् वेळ आवरून धरून त्या आंत वळल्या आणि खुर्चीवर बसल्या. हातांत पेन होतें. टेबलावर सगळी लेखनसामग्री जय्यत तयार होती. दृष्टी खालीं कागदाकडे वळविली होती. त्यांना पत्र लिहावयाचें होतें. पण त्याला वेळ कां ?

त्यांनीं पहिली ‘श्री’ काढिली. मुक्काम आणि तारीख उठवून दिली. नवीन ओळीला लगेच ‘सा. न. वि. वि.’ ही ठराविक ठशाचीं निरर्थक अक्षरेंही लिहिलीं. पण पुढें काय ? पुढें मजकूर काय लिहावयाचा ? लेखणीसह उजवा हात मेजावर ठेवून कोंपरावर उभा ठेवून त्याच्यावर मस्तक टेंकून त्या पुन्हां विचारमग्न झाल्या. काय लिहावें आणि कसा आरंभ करावा हें त्यांस सुचेना.

इतक्यांत मोलकरीण आंत आली. मालकीणबाई रिकाम्याच आहेतसें पाहून ती म्हणाली,

“बाईसाहेब, खालच्या सुधाबाई म्हणतात, कांहीं जरूरीच्या कामाकरितां आपण कल्याणहून जाऊन येणार, तोंपर्यंत शकूला तुमच्याकडेच वरती राहूं द्या.”

"बरं आहे म्हणावं, जा." इतकेच तुटक शब्द अनुमोदनादाखल पाठीमागें न पाहातां किंवा पुढ्यांतील कागदावरून दृष्टि न हालवतां विनोदिनी बोलल्या व त्यांनीं चुटकी वाजविली. त्यांना कांहींतरी कल्पना सुचली असावी असें वाटतें. वाटतें नव्हे, खरेंच. त्या पाहा त्यांनीं भराभर चारसहा ओळी कागदावर लिहिल्या देखील. त्यांचा हात पाहा कसा जलद चालतो आहे. शब्द कसे लेखणींतून झराझर उतरत आहेत. ओहो फुलस्टॉप ! लेखणी थांबली. पुन्हां त्यांनीं हातावर डोकें टेकलें. पण आतां त्या फारच अस्वस्थ झाल्या. त्यांच्या मनांत कांहींतरी पुष्कळसें लिहावयाचें होतें, पण लेखणींतून खालीं उतरत नव्हतें. त्या खुर्चीवरून उठल्या भिंतीवरच्या तसबीरींवर, खुंटीवरच्या कपड्यांवर, खिडक्यांवरच्या जाळ्यांवर, दरवाजांतल्या मण्यांच्या पोतकामावर, चोंहींकडे आळीपाळीनें केव्हां वर छपराकडे, तर केव्हां पायाखालीं अशी नजर फिरवीत इकडून तिकडे येरझाऱ्या, शतपावल्या घालीत त्या फिरूं लागल्या. फिरतां फिरतां राउंड टेबलावर पडलेला एक जुना पेपर त्यांना दिसला. तो त्यानीं उचलला. येरझारा घालीत असतां त्या वर्तमानपत्राच्या मजकुरावरून त्या आपली नजर घाई-घाईनें फिरवीत होत्या. लगेच त्या थबकल्या आणि आपल्या लिहिण्याच्या टेबलाकडे आल्या. त्यानीं एक कोरें पाकीट–एनव्हलप–उचललें, त्याच्यावर एक पत्ता लिहिला आणि तसेंच तेथें ठेवून तें वर्तमानपत्र त्यानीं जागच्या-जागीं उचलून ठेवलें. ज्या कॉलममधून त्यानीं नांव उतरून घेतलें तो कॉलम स्पष्ट दिसतो आहे. अतिवृष्टीमुळें नुकसान झालेल्या गरीब लोकांस ज्यांनीं मोठमोठ्या रकमा पाठविल्या अशा उदार लोकांचीं नांवें त्यांत छापलेलीं होतीं; त्यांतील एक नांव त्यांनीं त्या कोऱ्या पाकिटावर उतरून घेतलें होतें.

विनोदिनी पुन्हा स्वस्थलीं बसल्या. त्या पुन्हा भराभर लिहूं लागल्या. त्या कितीगण सुंदर दिसत आहेत. त्यांच्या त्या बसण्याच्या आणि लिहिण्याच्या एकंदर ठेवणीवरून त्या देवी सरस्वतीसारख्या शोभतात ! अहाहा ! काय तें लावण्य ! आणि त्यांत तो तारुण्याचा बहार ! रविवर्म्यानें अशाच एखाद्या सात्त्विक कुलशीलवतीस पाहून सरस्वतीचें कल्पनाचित्र रेखाटलें असावें. विनोदिनीच्या स्वभावांतील सौजन्याची शांतता आणि चेहऱ्या

वरील सुविद्यतेचे तेज लाखांतून एकाद्याच तरुणींत आढळेल. झालें. त्यांनीं तें आपलें पत्र एकदांचें पुरें केलें, आणि बाजूस ठेवून दिलें. तो लिफाफा आणि तें पत्र एकावर एक अशीं टेबलाच्या एका कोपऱ्यावर ठेवून त्यांनीं त्यावर कांचेचा पेपरवेट ठेवून दिला आणि वरती पाहात अर्धोन्मीलित नेत्रांनीं खुर्चीला रेलून त्या पुन्हा विचारमग्न झाल्या.

थोडक्याच वेळात जिन्यावर पावलांचा आवाज झाला. दरवाजांत पोस्टमन आला आणि त्यानें त्यांचें टपाल काढून त्यांच्यासमोर वर्तमानपत्राच्या राउंड टेबलावर ठेवलें आणि तो चालता झाला. विनोदिनी आतां कुठें शुद्धीवर आल्या. झटकन् उठून त्यांनीं आपल्या नांवाचीं पत्रें उचललीं त्यांतील एक पत्र त्यांनीं लगबगीनें उघडून वाचलें, आणि त्यांनीं लगेच आपल्या नोकरास हांक मारून आपली लेदरबॅग आणावयास सांगितलें. नोकरानें ती आणून पुढें ठेवतांच त्यांतील एक दोन वह्या व कांहीं कागद घेऊन टेबलावर व बॅग जागच्या जागीं पुन्हा ठेवावयास सांगितली.

त्यांनीं वही घेऊन पेन्सिलीनें त्या ज्या सारख्या लिहित सुटल्या त्या बराच वेळ थांबल्या नाहींत. मघांच्या पत्रासारखें त्यांना तासचे तास एका एका ओळीकरितां विचार करीत बसावें लागत नव्हतें. आणि आश्चर्याची गोष्ट अशी, कीं त्या लिहित होत्या तें एक काव्य होतें. कारण ओळी सगळ्या कवितेच्याच दिसत आहेत. काव्य इतकें जलद लिहिण्याला सरस्वतीचा प्रसाद असल्याशिवाय साधणार नाहीं. पण असें एकदम काव्य लिहावयास घेण्यास जें पत्र कारण झालें, तेंच आपण पाहा ना ! त्याच्यावरून विनोदिनी कोण हेंही आपल्याला कळून येणार आहे. त्यांचें नांव आपल्या परिचयाचें आहे. पण विनोदिनी हें त्यांचें नांव मात्र आपल्या परिचयाचें नव्हतें, म्हणून त्यांची ओळख आपल्याला अद्याप पटलेली नाहीं.

**श्री**

**जा. नं.** **" उषःकाल " ऑफीस्. ता.**

सा. न. वि. वि.

आठ दिवसांपूर्वी आपल्याला कळविलेंच आहे, कीं " उषःकाल "च्या खास अंकाच्या पहिल्या पानावर घेण्याकरितां आपली कविता पाहिजे. आपणही पाठविण्याचें आश्वासन दिलें होतें, पण अद्याप कविता आमच्या

हातीं आलो नाही म्हणून हें पत्र पाठविलें आहे पहिल्या फॉर्माचा सगळा मजकूर कंपोज होऊन तयार आहे. तरी फक्त आपली "**कीर्तिमाला**" यांची कविता पाहिजे आहे. तरी उलट डांकेनें पाठविण्याची कृपा करावी अशी विनंति आहे.

आपल्या काव्याची पहिली आवृत्ति एकाच महिन्यांत उडून गेली. मराठी वाङ्मयांत ही गोष्ट सर्वांना नवलाचीच वाटणार आहे. इंग्रजींतल्या वाङ्मयाप्रमाणें मराठी पुस्तकांच्या अशा आवृत्या निघत नव्हत्या. आपलें खरें नांव जाणून घेण्याची तर जनतेंत इतकी उत्सुकता वाढली आहे, कीं कित्येकांनीं "आम्हांस नांव निदान खासगी रीतीनें न कळविल्यास वर्गणीदार होण्याचें बंद करूं" असा प्रेमाचा धाक घातला आहे. यापुढें आपलें खरें नांव प्रसिद्ध करण्याची आम्हांस परवानगी न दिल्यास मोठीच अडचण होणार आहे.

आपलें चालू असलेलें काव्य पुरें कधीं होणार, अशी पृच्छा रोज होत आहे. तें काव्य आतां हप्त्यांनीं न पाठवितां सर्वच्या सर्व पुरें करून पाठवावें, म्हणजे त्याचें पुस्तक देखील लगेच तयार करतां येईल. काव्याचा राहिलेला भाग या खास अंकांत देखील थोडा तरी घ्यावा लागणार असें दिसतें. पुस्तकप्रकाशनाच्या बाबतींत आपण सांगितलेल्या सर्व अटी कबूल आहेत.

क. लो. वि.

आ.

सं. "उषःकाल"

आतां आपण जिचें वर्णन वाचलें, ती "कुमारी कीर्तिमाला" ही सुप्रसिद्ध कवयित्री? असें आमच्या प्रत्येक वाचकाच्या तोंडून उद्गार निघाल्याशिवाय रहावयाचेच नाहींत, याची आम्हांला पूर्ण खात्री आहे. "कुमारी कीर्तिमाला" सर्वांनाच ठाऊक आहे. पण विनोदिनी मात्र ठाऊक नाहीं. आपल्या प्रतिभाशाली कवितांनीं महाराष्ट्र वाचकांना डोलावयास लावणारी कीर्तिमाला परिचित नाहीं असा एकही मराठी वाचक सांपडणार नाहीं. पण कुमारी कीर्तिमाला आतां सौभाग्यवती विनोदिनी झाली होती हें कोणालाच ठाऊक नाहीं. त्यांचा विद्याधराशीं प्रीतिविवाह झाला होता. विद्याधर–विनोदिनी हें परस्परानुरूप असेंच जोडपें होतें.

विद्याधर हेही एक प्रख्यात कादंबरीकार होते. त्यांचें मराठी आणि इंग्लिश या दोन्ही भाषांवर सारखेंच प्रभुत्व होतें. ते एका इंग्लिश दैनिकाचे पहिले उपसंपादक होते. कादंबरीकार व कथालेखक म्हणून त्यांची कीर्ति कुमारी कीर्तिमालेइतकी नसली तरी त्यांच्या खालोखाल होती. विनोदिनींना विद्याधरांपासून कथालेखन–प्रावीण्य संपादन करावयाचें होतें. त्यांचा विवाह झाल्यानंतर तर त्यांनीं विद्याधरांपाशीं सारखा हट्टच धरला होता. पण विद्याधरांस पुरेसा वेळच मिळत नसे. शेवटीं आरंभीं सांगितल्याप्रमाणें विद्याधरांनीं विनोदिनीला पहिला धडा देण्याचें ठरवून गोष्टींत घालण्या-करितां एक पत्र तयार करावयास सांगितलें.

असें सांगण्यांत त्यांचे एक दोन हेतु होते. कारण सुरवात केल्याशिवाय त्यांना विषयच सुचत नसे. आणि विनोदिनींना तर सुरवातच करतां येईना. अमुक एका विषयावर गोष्ट लिहावयाची असें ठरवून डोकें चोळीत बसण्या-इतकी विद्याधरांना फुरसत नव्हती. तेव्हां पत्र लिहून तयार झालें, कीं ती मध्यवर्ती कल्पना धरून तिच्या भोंवतीं गोष्टीचें जाळें पांच मिनिटांत विणून तयार करण्याइतकी विद्याधरांची सरस्वती त्यांच्यावर सुप्रसन्न होती; म्हणूनच त्यांनीं ऑफिसांत जातानां 'पत्र लिहा' म्हणून विनोदिनींना सांगून ठेविलें होतें.

परंतु "उषःकाल"च्या संपादकांचें निर्वाणीचें पत्र येतांच त्यांना गोष्ट बाजूला ठेवून काव्य ताबडतोब हातांत घेणें भाग पडलें. काव्याचा उरलेला भाग पुरा करून तो दुरुस्त करून व कविता निवडून तो सर्व मजकूर त्यांना आजच्या आजच पाठवावयाचा होता. म्हणून त्यांनीं कविता लिहिणें हातीं घेतलें होतें. त्यांत त्या गुंतल्या असतां सहा वाजून केव्हा गेले हें त्यांच्या लक्षांतदेखील आलें नाहीं. त्यांच्या कानाजवळची टेलिफोनची घंटा वाजली तेव्हांच त्या झोंपेंतून जागें झाल्याप्रमाणें डोळे चोळूं लागल्या.

टेलिफोन विद्याधरांचा होता. विद्यावती नामक एका बंगाली विदुषीचें व्याख्यान दुसऱ्या दिवशीं ठरवावयाचें होतें. त्या विद्याधरांच्या ऑफिसांत आल्या होत्या. त्यांच्याशीं विनोदिनीची ओळख करून देणें विद्याधरांस योग्य वाटलें. त्यांना दुसरीकडे जावयाची घाई असल्यामुळें विद्याधरांना विनोदिनीलाच आपल्या ऑफिसांत बोलावणें योग्य वाटलें.

विनोदिनींनीं कपडे करून विद्याधरांच्या ऑफिसाचा रस्ता सुधारला. जातांना त्यांनीं जरूर त्या गोष्टी नोकरमाणसांस सांगितल्या आणि तासाभऱ्यानें• परत येईन असें सांगून त्या निघून गेल्यावर एक नोकर आला व त्यानें त्यांचें लेखनसाहित्य कागदपत्र नीटनेटके करून ठेविले, आणि तो त्यांचीं पत्रें पोस्टांत टाकावयाचीं लिहून ठेविलीं होतीं तितकीं सारीं घेऊन पोस्टाच्या पेटींत टाकावयासाठीं गेला.

कांहीं दिवस गेल्यावर एका सुटीच्या दिवशीं बोलतां बोलतां विनोदिनींनीं आपलें खरें नांव प्रकट करावें कीं नाहीं याविषयीं त्या दोघांमध्यें चर्चा सुरू होती. विनोदिनी त्या गोष्टीस नाकबूल होत्या. विद्याधरांना त्याबद्दल तितकासा विधिनिषेध नव्हता. परंतु ' उषःकाल 'च्या संपादकांकडून पुनरपि नांव प्रसिद्ध करण्याविषयींची परवानगी मागण्याचें पत्र आल्यावरून तो प्रश्न निघाला होता.

" इतक्यांतच नांव प्रसिद्ध करण्यांत आपल्याला कोणता फायदा दिसतो ?" विनोदिनींनीं विचारलें.

" प्रसिद्ध न करण्यात आपल्याला कोणता फायदा दिसतो ?" विद्याधरांनीं उलट प्रश्न केला.

" कां ! लोकांचा आदर टोपणनांवाभोंवतीं जितका अधिक काळ गुंगत राहातो तितका तो खऱ्या नांवाभोवतीं राहात नाहीं."

" म्हणजे रसिकांचा आदर, लेखनकौशल्याबद्दल नसून तो फक्त नांवाबद्दलच असतो असें आपलें म्हणणें दिसतें तर ? "

" असेंच कांहीं नाहीं; पण ज्या अज्ञात नांवाच्या लेखकाच्या लेखनाबद्दल वाचकांना कौतुक अथवा आदर वाटतो तो अमुक एक आहे असें कळून येतांच तो थोडा तरी कमी झाल्याशिवाय राहात नाहीं. कां कुणास ठाऊक ! असें होतें हें मात्र खरें."

" पण तुमच्याबद्दल प्रकार निराळाच आहे. तो प्रसिद्धीस आला तर त्यांत आमचा एक प्रकारचा फायदाच आहे."

" तो कसा काय बाई ?" विनोदिनींनीं कुतूहलानें हसत विचारलें.

" कसा म्हणजे ? " विद्याधर देखील हसतच म्हणाले, " कसा म्हणजे ? आहे आपला कसा तरी."

" पण कसा तें सांगायचं ना ? "

" कसा तें सांगितल्यावर त्याच्यावर शंका कुशंका काढतां नयेत. आहे कबूल ? "

" हो हो ! कबूल-कबूल ! "

" आपला परिचय करून देतांना-आपला, म्हणजे आपल्या खऱ्या नांवाचा परिचय करून देतांना वर्तमानपत्रकर्ते कसें लिहिणार, तें आहे का तुम्हांला ठाऊक ? "

" कसें लिहिणार ? "

" सुप्रसिद्ध महाराष्ट्र कवयित्री कुमारी " कीर्तिमाला " या सौ. " विनोदिनी " * * " होत. या रा. विद्याधर * * * * यांच्या पत्नी वगैरे वगैरे. झालें. म्हणजे यांत तुमच्या परिचयापासून आमची एक नवीन प्रकारची फुकटची प्रसिद्धी होणार आहे. हा काय थोडा फायदा झाला ? "

" भलतंच कांहींतरी ! उलट मलाच यांत फायदा होणार मी म्हणतें. सौ. विनोदिनी म्हणजे श्री. विद्याधर * * * * या सुप्रसिद्ध महाराष्ट्र कादंबरीकारांच्या व * * * या इंग्लिश दैनिकाच्या एका संपादकाच्या पत्नी असा दुहेरी किताब मला मिळावयाचा आहे. "

" तसें कां होईना ? होऊन जाऊं द्या. चला करा तुमच्या खऱ्या नांवाची प्रसिद्धी. अधिक फायदा कोणाला होतो, तें आपोआपच मग समजून येईल.'

असें त्या उभयतांचें बोलणें चाललें आहे, तोंच नोकरानें दोन पत्रें आणून दिलीं. तो म्हणाला, " चार दिवसांपूर्वीं हीं पत्रें विसरून द्यावयाचीं राहिलीं. " त्यांतील एक विनोदिनींनीं वाचून पाहिलें, तों त्यांचें हासणें त्यांना आवरेनासें झालें. त्या सारख्या खो खो खो हासत सुटल्या ! आणि वर पाहा-तात तर विद्याधरांचा चेहरा विचारांत व कोणती तरी गोष्ट उलगडण्यांत गढून गेल्यासारखा दिसला. विनोदिनींनीं आपल्या हातचें पत्र त्यांच्या हातांत त्यांनीं घेऊन तेंही वाचलें पण. दोन्हीं पत्रांचा अर्थ त्यांना कळेना. त्यांच्याकडच्या पत्रांवरून विनोदिनींनीं नजर फिरविली. आतां तर त्यांच्या हास्याचा कळस झाला. पहिलें पत्र वाचतांना क्षणभरच त्यांना विचार करावा लागला होता, नंतर त्यांनीं धोरणानें सारा प्रकार ताडला आणि आपल्या नोकरास हांक मारून विचारलें,

"ज्या दिवशीं इकडून टेलिफोननें बोलाविल्यावरून मी ऑफिसांत गेलें, त्या दिवशीं बंद न केलेलें एक पत्र बाकीच्या पत्रांबरोबर आपणच बंद करून तूं पोस्टांत टाकलेंस काय ?"

"होय बाईसाहेब,"

"जा. एरवींच विचारलें मीं, त्यांत असें कांहीं घाबरायला नको."

नोकराच्या जिवांत जीव आला तो निघून गेला पण विद्याधर मात्र या सगळ्या प्रकाराकडे "आ" पसरून बसले होते. त्याना पूर्वीच्या किंवा आतांच्या प्रश्नोत्तराचा कांहींच अर्थ समजेना. त्यांच्या भाषणातील सारा विनोद मावळून त्यांनीं किंचित् त्रासिक स्वरानें विचारलें,

"काय आहे ही सारी भानगड ?"

विनोदिनीनें कांही एक उत्तर न देतां झराझर एक पत्र लिहून तें विद्याधरांच्या हातांत दिलें. पण कांहींएक उत्तर न देतां विनोदिनी तें पत्र लिहीत असतां विद्याधरांचा त्रासिकपणा गणितश्रेढीनें वाढ घेत चालला होता.

विनोदिनीनें हातांत दिलेलें पत्र त्यांनीं वाचून पाहिलें. तरी देखील एकदर प्रकाराचा त्यांना नीट उलगडा होईना. तथापि वाचकांनीं तें पाहून त्यांना त्याचा काहीं उलगडा करतां येण्यासारखा असल्यास पाहावा. तें पत्र विनोदिनीच्या सहीचें होतें. पत्ता तोच होता. तें पत्र पुढील प्रमाणें होतें—

तारा महाल, मुंबई.

ता.

सा. न. वि. वि.

आपलेकडून बरेच दिवसांत हल्लीं कांहीं बातमी समजली नाहीं, तरी आतां उत्तरीं कळवावी. आपण इथून जातांना एका आपल्या मुलाला ठेवून गेलांत तरी आतां त्याला घेऊन जावें, तो आपली आठवण काढीत असतो. आपण परत येऊन आपल्या मुलास घेऊन जाल असें वाटत होतें पण तसें घडलें नाहीं, व पत्रही नाहीं. यावरून आपण त्यास इतक्या अल्प अवधींत विसरलां तर नसाल ना ? अशीही शंका येते. आपण आपल्या संसार-व्यवहारांत सुखानें असतां, आपल्या पहिल्या मुलाची आठवणही होऊं नये याचें आश्चर्य वाटतें ! तरी त्याला घेऊन जाण्याची आपण कांहीं तजवीज कराल अशी आशा आहे. उत्तर यावें. क. लो. वि.

आ.—"**कीर्तिमाला**"

हेंच तें विनोदिनीचें पत्र होतें. पण या पत्रावरून विद्याधरांना काय बोध होणार ? त्यांचें मनःस्वास्थहि थोडथोडें भंग पावूं लागलें. विनोदिनी त्यांना सर्व प्रकार समजावून देऊं लागल्या; पण ती समजूत आमच्या वाचकाकरितां आम्हींच खालीं देतों.

हें पत्र लिहिण्याच्या विचारांत विनोदिनी गढल्या असतां मोलकरणीनें जो निरोप त्यांना सांगितला, त्याच्या आंदोलनाचा परिणाम त्यांच्या मेंदूवर होऊन तशाच प्रकारचा कांहींसा मजकूर वरील पत्रांत उमटला. मानसशास्त्रवेत्त्यांस या प्रकारचें आश्चर्य वाटणार नाहीं.

गोष्टीच्या आरंभी सांगितल्याप्रमाणें विद्याधर विनोदिनींना पत्र लिहावयास सांगून गेले. पत्र लिहिण्याच्या पूर्वीं त्यांनीं मनांत एक कथासूत्र योजिलें, आणि कथासूत्रास अनुसरून पत्राची भाषा लिहिली. गोष्टींतल्या पत्राच्या मालकाचें नांव मजेदारसें शोधून काढावें म्हणून त्यांनीं वर्तमानपत्राच्या अंकांतून एक बरेंचसें नांव शोधून काढलें, व तें लिफाफ्यावर लिहून ठेवलें. त्याच धर्तीवर त्या गोष्टींत नांव बनावट बनविणार होत्या. पण पुढील भाग लिहावयाचा राहिला, त्याची आठवण झाली. बंगाली विदुषी विद्यादेवी ह्यांची गांठ पडून त्यांच्याबरोबर येण्याजाण्यांत व पाहुणचार करण्यांत आरंभी कांहीं दिवस गेल्यावर व नंतरही निरनिराळ्या नियतकालिकांच्या विनंत्यांस उत्तरें दिल्यावर गोष्टीचा प्रश्न जेव्हां प्रथम एकदां काढला, तेव्हां कोठें त्या पत्राची आठवण झाली. पण तो विषय त्या वेळीं देखील तसाच राहिला. आज मात्र तो जोरानें पुढें आला. पण आतां काय करणार ? आतां नोकराच्या चुकीनें त्या वर्तमानपत्रांतील नांवाच्या मालकास पत्र पोंचून त्याचें उत्तर देखील आलें होतें. पण त्यांतही भानगड होती. एकाच सहीचीं दोन पत्रें आलीं होतीं. पत्ता एकच. सही एकच. अक्षर मात्र निरनिराळें. या कोड्याचा उलगडा मात्र खुद्द विनोदिनींनाही होत नव्हता.

ज्या शेठजींस तें पत्र पाठविलें होतें, त्यांना पहिला मुलगा नव्हता. त्यांना पहिल्या कुटुंबाची एक मुलगी असून, ती लग्न करून दिली होती व त्यांनीं साधारण प्रौढ म्हणजे उतार वयांत द्वितीय संबंध केला होता. त्यांची नूतन पत्नी जरा तोऱ्यांतच वागणारी होती. शिवाय वधूपक्षाकडून

शेटजींच्या द्रव्याच्या आशेनेंच हा संबंध घडून आला होता. शेठजींच्या मेहुण्यांनीं पुढच्या तजविजीनें शेठजींच्या पेढीवर मुनीमपणा पत्करला होता. ज्या दिवशीं पत्र आलें, त्या दिवशीं शेठजी एका जवळच्याच गांवीं गेले होते. पण ज्याच्यावर 'खासगी' अशीं अक्षरें नसतील तीं शेठजींच्या नांवची पत्रें व्यवहाराकरितां त्यांचा मेहुणा—मुनीम उघडीत असे. विनोदिनीचें वरील गोष्टीच्या रचनेचें काल्पनिक पत्र शेटजींच्या मेहुण्याच्या व शेटाणींच्या हातीं पडून शेठजींच्या संसार-रंगभूमिकेवर जो थयथयाट उसळला त्याचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे.

बंधुराजांस किंवा दुसऱ्या कोणास न कळवितां शेटाणीनें शेठजींच्या नांवचें एक पत्र विनोदिनीच्या पत्त्यावर लिहिलें, कीं आपण आपल्या मुलास फिरून घेऊन जाण्याकरितां लवकरच येत आहोंत. बाकी सोसाव्या लागलेल्या तसदीबद्दल दिलगिरी दर्शवून माफी मागण्यांत आलेली होती.

दुसरें पत्र खुद्द शेठजींनीं आपल्या मेहुण्याच्या व बायकोच्या खात्री-करितां लिहिलें होतें. हा कांहींतरी घोटाळा असून त्याचा उलगडा आपण लागलीच करूं, असें सांगून त्यांच्या समक्ष त्यांनीं विनोदिनीला पत्र लिहिलें. त्यांत त्यांनीं विनोदिनीला केलेल्या विधानांचा खुलासा करण्याविषयीं विनंती केली होती. परंतु पत्रांचीं उत्तरें येईपर्यंत शेटजींच्या घरचा कलह थांबणार कसा? मंडळी थोडीच समजूतदार होती? कलहाला उग्रस्वरूप येऊन फसवेगिरीबद्दल शेटजींस कोर्टाचा धाक दाखविण्यांत येऊं लागला. उलट टपालाचें खुलाशाचें उत्तर येण्याची मुदत टळतांच शेटजी, शेटाणी, मुनीम व वकील अशीं मुख्य पात्रें व कांहीं दुय्यम पात्रें मुंबईत तारामहालाचा शोध काढीत विनोदिनी—विद्याधरांच्यासमोर येऊन उभीं राहिलीं. विनो-दिनी त्या वेळीं गफलतीच्या पत्रांबद्दल विद्याधरांकडे खुलासा करीत बसल्या होत्या. आपलीं पत्रें आल्याबरोबर न देतां नोकरानें तीं पांच सहा दिवस विसरून गचाळपणें आपल्या खिशांत ठेविलीं होतीं, ही त्यानें सांगितलेली गोष्ट, विनोदिनी विद्याधरांस गोष्ट समजावून सांगण्याच्या घाईत विसरल्या होत्या. शेटजींचें सर्व लटांबर त्या दोघांच्या समोर उभें राहातांच दिसणारा देखावा रेखाटण्यास तसाच एखादा चित्रकार पाहिजे होता!

## काटकसर

तालुक्याचेंच गांव तें. बाजारच्याच बाजूला भाजीवाल्या बाया येऊन बसत असत. आजूबाजूच्या खेड्यांतून तीन तीन चार चार मैलांवरून भाजीवाल्या व लाकडाच्या मोळीवाल्या बाया येत; आणि आपापला माल विकून झाला, कीं संसारपयोगी जिन्नस घेऊन घरीं जात असत.

तांबड्या पाल्याच्या भाजीनें भरलेली टोपली घेऊन एक पंचवीस तीस वर्षांची बाई बसली होती. टोपलीच्या बाजूला एकच केळीचें बोंड (केळफूल) ठेवलेलें होतें. ती गिऱ्हाईकाची वाट बघत होती.

भाजीच्या पेंढ्या आधींच बांधून ठेवलेल्या होत्या, पैशाला फार तर दोन द्यावयाच्या असें तिला सासूनें सांगितलें होतें. ती कांहीं नवऱ्यानें बाजारहाट करायला आली नव्हती.

एक गिऱ्हाइक आलें. त्यानें भाजी पाहिली.

"किती पेंढ्या पैशाला ?" त्यानें विचारलें.

"दोन पैशांक तीन." तिनें उत्तर दिलें.

"पैशाला चार चार पेंढ्या देत नाहींस ?"

"नाय बाबा !" ती कष्टानें बोलली.

गिऱ्हाईक निघून गेलें.

दुसरें आलें आणि तशीच चौकशी करून निघून गेलें.

तोंपर्यंत तसलीच भाजी विकणाऱ्या आणखी भाजीवाल्या आल्या. त्याही तिच्याच शेजारीं आपापल्या टोपल्या घेऊन बसल्या. गिऱ्हाइकांची संख्या रोजचीच होती. त्या मानानें आज भाजी बरीच आली. पेंढ्याच्या दर स्वस्त करावा लागला. कारण एक दोघींना माल विकून लवकर घरीं जायचें होतें. त्या स्वतःच मालकिणी होत्या.

त्यांनीं प्रथम दर पैशाला दोन पेंढ्या विकायला सुरवात केली.

ही बाई संकटांत पडली.

हिला घाम आला होता. पदरानें ती आपल्या कपाळाचा घाम पुसणार होती. तिनें हलक्या हातानें पदर ओढला, पण तो फाटूनच हातांत आला !

तें तिचें एका काळचें लुगडें कितीतरी जीर्ण झालेलं होतें.

कुळकर्ण्यांच्या घरीं दळणकांडणास ती जात असे. कुळकर्ण्यांच्या बायकोनें आपलें अगदीं जीर्ण झालेलें जुनेर हिला दोनतीन खेपांच्या मजुरीऐवजीं म्हणून दिलें होतें. पण हिला त्याचेच किती उपकार वाटले होते !

पण आतां तें देखील अगदींच तोकडें झालें.

हिनें डाव्या हाताच्या कोपरात तोंड दडवलें आणि दोन हुंदके दिले.

पाठीमागच्या बाजूस एक लाकूडमोळीवाली बाई आली होती. तिनें आपली मोळी खालीं उतरली आणि लांबलचक सुस्कारा सोडला.

" गोजऱ्या ! काय गो असां करतस ? "

तो प्रश्न ऐकून ही गोजरा चकित झाली. हिच्याच अवाठांतली ती मोळीवाली होती.

" काय नाय गे मावशे ! " ही भाजीवाली गोजरा म्हणाली. तिनें तोंड वर केलें. कारण तितक्यांत एक गिऱ्हाईक आलें होतें.

" किती पेंढ्या पैशाला ? "

" पैशाक दोन "

" त्या बघ तिकडे पैशाला चार चार मिळतात. "

" मी बाबा सासुरवाशी सूनमाणूस. माजां धाकटां घराकडे तापान तडफडत पडलांहा. पैशाक तीन पेंड्यो घे. देव तुजां बरां करीन."

गोजराचा स्वर कांपरा येत होता.

" पण तुझ्या पेंढ्या लहान आहत. चार चार देशील तर बघ—" असें म्हणून गिऱ्हाईक निघून गेलें. ती त्या माणसाकडे बघत राहिली होती.

शेजारच्या दुकानांतून त्या माणसानें घरीं जातांना एक विलायती सेंटची बाटली घेतली होती. तिला बरेच पैसे त्यानें खळकन् मोजले होते. गोजराच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. कारण आतां साडे दहा अकरा होण्याचा वेळ आला होता. गोजराची तीनचार पैशांचीच भाजी आतांपर्यंत

एक आणखी गिऱ्हाईक आलें.

" काय गे त्या केळफुलाला ? "

" बोंडाचे ? त्या बोंडाचे तीन पैसे. " गोजरा म्हणाली.

" तीन पैसे ? अबब ! एक पैशाला देतेस ? "

" नाय बाबा ! " गोजरानें त्या गिऱ्हाइकाकडे पाहिलें. तीस पस्तीस वर्षांचा तो गृहस्थ होता. तांबूलरसानें त्याचें तोंड रंगलें होतें. डाव्या हातांत सोन्याचें रिस्ट वॉच होतें. पायांत चकचकीत शू होता. केसांना लावलेल्या प्रसाधनांचा वास हवेंत दरवळला होता.

" बरं दीड पैशाला तरी ? " त्यानें विचारलें.

" अडीच पैशांक जास्यार घे. " गोजरानें करारी स्वरानें म्हटलें.

तोंडाचा घाम पुसण्याकरितां गोजराच्या हात पदराकडे गेला आणि तो तसाच मागें परतला !

गिऱ्हाईक गृहस्थ रेशमी हातरुमालानें आपलें तोंड पुशीत होता.

" दीड पैशाला नाहीं देत ? आतां बारा वाजतील आणि मग तुझ्या भाजीला चांगलाच दर येईल. मग बघूं. " असें उपरोधिकपणें म्हणत तो जायला निघाला.

" बरां बाबा ! घे तर दीड पैशाक. " गोजरानें रडकुंडीनें म्हटलें.

गृहस्थाला फार आनंद झालासें त्याच्या चर्येवरून दिसलें असतें. त्यानें खिशांत हात घातला.

" पण मोड नाहीं. चल त्या तिथं माझ्याबरोबर, मग पैसे देतों. "

गोजराचा नाइलाज झाला.

तिनें मोळीवाल्या मावशीला टोपलीवर नजर ठेवायला सांगितली आणि ती गिऱ्हाइकामागून गेली.

तो गृहस्थ जातां जातां एका दुकानांत शिरला आणि त्यानें सिगारेटची डबी विकत घेतली.

गोजरानें पाहिलें, कीं दराभावाची चौकशी देखील न करतां त्याच गृहस्थानें एकदम पुष्कळसे पैसे फेकून दिले होते. त्यांत परदेशी तंबाकूच्या कागदी विड्या होत्या. गोजराच्या डोक्यांत हजारों प्रश्नांनीं, हजारों शंकांनीं गर्दी करून सोडली. पण त्या दुकानांत त्याला मोड मिळाली नाहीं.

तो गृहस्थ जवळच्याच एका माडीवर चढला. तेथें त्याच्याचसारखे आणखी पांचसहा गृहस्थ जमले होते. चहा-चिवडा-चिरूटांची चंगळ चालली होती.

" चला बसा. होऊं द्या सुरवात." तो गृहस्थ आपल्या सोबत्यांस म्हणाला, " चार डाव खेळूं."

" किती उशीर केलात ? आम्ही आतां जाणार होतों उठून तुमची वाट बघून."

" अरे पण आतां बसूं ना थोडा वेळ !" तो गृहस्थ म्हणाला.

" पण कालचे पंचवीस रुपये हरलांत ते आधीं मोजा." एकानें म्हटलें.

" अरे जा ! असल्या धमक्या कोणाला दाखवतां ? हे घ्या कालचे पंचवीस रुपये." त्या गृहस्थानें दहा दहा रुपयांच्या दोन आणि पांच रुपयांची एक अशा तीन नोटा फेकून दिल्या.

गोजरा त्या प्रकाराकडे पाहात होती. तिचे पाय लटपटत होते. तिला कांहीं सुचत नव्हतें.

त्या गृहस्थाची नजर तिच्याकडे गेली.

" अरे हो ! कोणाकडे मोड आहे का ? " त्या गृहस्थानें शू काढून जाजमावर तक्याला टेकून बसतां बसतां विचारलें.

" केवढ्याची ? "

" एक आण्याचे सुटे पैसे पाहिजेत. "

" पण आणा आहे का ? "

" ओ हो ! रुपयाच मोडला पाहिजे."

" अरे मग मागवा कीं चहा."

" त्यांनीं गड्याला हाक मारली आणि रुपयाच्या मोडीसाठीं आठ दहा आण्यांचे चहापार्टीचे जिन्नस शेजारच्या हॉटेलांतून आणावयास सांगितले.

मोड आणली पण त्यांत सुटे पैसे नव्हते.

एका इसमानें एक आण्याचे चार पैसे दिले.

" अरे ! हे चार पैसे सुटे होते तर मघाशींच कां नाहीं दिलेस ? " त्या गृहस्थानें पश्चात्तापानें विचारलें.

" भले राव ! आणि मग चहापार्टी कशी मिळाली असती ? "

" बरं पण आतां अर्धा पैसा कसा मिळणार बोवा ? " मोठ्या संकटांत सापडून तो गृहस्थ बोलला.

" दोन पैसेच देयनास ?" गोजरानें मोठा धीर धरून आशेनें म्हटलें.

" वा ! मोठी शहाणीच आहेस ? पैसे म्हणजे काय तुझ्या परड्यातली भाजी वाटते. पैशाला जसं मोलच नाहीं, भलताच दर घालून तुम्हांला सवय करणार नाहीं आम्ही मुलखावेगळी. संसार कसा काटकसरीनं केला पाहिजे."

" नाहींतर काय ? " बाकीचे म्हणाले.

" जारे ! एक आगपेटी घेऊन ये. " त्या गृहस्थानें पुन्हा गड्याला पाठविला.

गडी गेला व तो थोड्याच वेळांत एक आगपेटी व बाकीचे पैसे घेऊन आला. त्यांत एक अर्धा पैसा होता. तो मिळवायला गड्याला दुकानदाराची कितीतरी पायधरणी करावी लागली होती.

त्या गृहस्थानें एकच पैसा गोजराच्या आंगावर फेकला. गोजरा त्याच्या तोंडाकडे बघूं लागली.

" जा ना घेऊन ! " गृहस्थ तिरस्कारानें म्हणाला. आतां ते चौघे आसामी बसून पत्ते पिसीत होते. दोघे बघण्यासाठीं सरसावले होते.

" असां काय ? माजो अर्दो पैसो ? " गोजरानें प्रश्न केला.

" भारी चिकट बोवा या भाजीवाल्या ! " त्या गृहस्थानें कपाळास आंठ्या घालून शेवटीं अर्धा पैसा फेकला. तरी गोजरा तेथून ढळेना !

त्या गृहस्थाशिवाय बाकीचे सगळेजण ती कशाची वाट बघत आतां राहिली असावी याचा विचार करीत तिच्याकडे पाहूं लागले.

" हो पैसो झरको – सुळसुळीत ! " तिनें दुःखी कष्टी मुद्रा करीत म्हटलें.

" जा जा ! माझ्या घरांत टांकसाळ नाहीं, जा. " त्या गृहस्थानें जवळ जवळ दरडावलेंच.

गोजरा रडक्या मुद्रेनें माडीवरून खालीं उतरली.

ती आपल्या टोपलीकडे आली तों टोपलीजवळ एक पोलीस उभा होता ! गोजराच्या काळजांत धस्स् झालें !

बाजाराला यावयास निघण्यापूर्वी वैद्यानें तिच्या मुलाला तपासलें होतें. औषधासाठीं आलें, मध व तूप पाहिजे होतें. चार तोळे तूप, दोन तोळे

मध आणि पैशाचें आलें इतक्या जिनसा तिला घेतल्याच पाहिजे होत्या. पण तितके पैसे अद्याप तिच्याजवळ जमले नव्हते.

"उचल तिथली टोपली !" पोलीसानें दरडावलें.

"कित्या ?" तिनें कळवळ्यानें विचारलें.

तितक्यांत पोलीस खालीं वाकला. त्याच्याबरोबर त्याचा सोबती दुसरा एक पोलीस होता. त्या दोघांच्या संसाराच्याच गोष्टी चालल्या होत्या.

"संसार कसा काटकसरीनें केला पाहिजे" एक जण दुसऱ्याला म्हणत होता.

"होय तर. पगारांतला पैसा जर भाजीपाल्यास खर्च केला, तर मग पोलीसची नोकरी पतकरावी कशाला ?" दुसरा उत्तरला.

पहिल्या पोलीसानें तीनचार पेंढ्या उचलून पिशवींत भरल्या.

"दोन पैशे दिया !" गोजरानें मागणी केली.

"काय ?" पोलीसानें डोळे वटारीत धमकावणीनें विचारलें.

"भाजयेच्चे पैशे ?" गोजरानें केविलवाण्या चेहऱ्यानें विचारलें.

"पैसे ? पैसे हवेत तुला ह्या भाजीचे ?"

त्या पोलीसानें भाजीची पिशवी आपल्या सोबत्याकडे दिली.

"चल उचल टोपली आणि जा निघून इथून." असें म्हणून त्यानें टोपलीला हात घातला.

इतक्यांत ती स्वतःच टोपली उचलीत असतां, आणखी कोणाचा धक्का लागून टोपली जोरानें पलीकडे उडाली आणि भाजी जमिनीवर चोहींकडे सांडली.

जवळच एक बैल होता. त्यानें चटकन् बऱ्याचशा पेंढ्या मटकावल्या !

जनतेच्या रक्षणाकरितां नेमलेला पोलीस आपलें कर्तव्य करून, पुढचें कर्तव्य बजावण्यासाठीं घाईनें घरीं निघाला होता.

गोजरा कपाळावर हात घेऊन मटकन् खालीं बसली. तिला रडें कोसळलें घेरी येऊन तिला जमीन फिरत, खालींवर हालत असल्यासारखें वाटत होतें.

माडीवर जुगार जोरांत चालू होता. तो गृहस्थ पैसे कमावीत होता आणि गमावीत होता !

जनतेचा रक्षक पोलीस तेथें फिरकला नव्हता !

## भिकारी

“ **एक** पैसा घाला गरिबाला.” दारांत एक भिकारी ओरडला.

आंतील दिवाणखान्यांत दोन स्त्रिया बोलत बसल्या होत्या. त्यांच्या कानीं त्याचे शब्द गेले नसावे. त्यांचें बोलणें रंगांत आलें होतें.

“एक पैसा देतां काय हो गरीबाला वैनीबाय?” पुन्हा भिकाऱ्यानें साद घातला. तरी आंतील दोघा तरुणींचें लक्ष तिकडे वेधलेंच नाहीं.

“अव न्हाय तर न्हाइ म्हून म्हणा. उगाच भिकाऱ्याला ओरडाया कशा पायीं लावल्यासा?” असें म्हणून भिकारी दुसऱ्या घरीं जावयास निघाला. वल्लिकेचें लक्ष दुसऱ्या हाकेलाच त्याच्याकडे गेलें होतें. पण मल्लिकेच्या बोलण्याला खळच पडेना. म्हणून तिनें ओ दिली नव्हती, एवढेंच. पण आतां ती उठून त्या भिकाऱ्याला बोलवायला बाहेर जाऊं लागली.

“चोर तो चोर अन् शिरजोर! म्हणतात ना त्यांतली गत!” ठेंगणी ठुसकी नटवी मल्लिका म्हणाली, “वल्लिके, कशाला ग इतक्या मिनतवारीनं त्या भिकाऱ्याला आमंत्रण द्यायला जातेस? गेला तर गेला मेला. असे भिकारी दिवसांतून सत्राशें येतात, या मुंबई शहरांत.” तिनें समोरच्या आरशांत पडलेल्या आपल्या प्रतिबिंबाकडे पाहात समाधानाच्या आनंदांत म्हटलें.

“मल्ले! अग तो रोजच्या भिकाऱ्यांसारखा दिसत नाहीं. दुसऱ्या निसुग भिकाऱ्यांचा लाचारपणा त्याच्या मुद्रेंत मला दिसला नव्हता. तुझं बोलणं संपेना म्हणून त्याला मीं उत्तर दिलं नाहीं, हा माझा दोष. तो भिकारी जातांना शिव्या देत देखील गेला नाहीं! थोडासा अभिमान मात्र दिसला त्याच्या चर्येवर. तो खरा भिकारी नसावा असं मला वाटतं.” वल्लिका मागें परतत असतां म्हणाली. तिनें भिकाऱ्याला हाक मारली. तो मागें परतूं लागला होता. वल्लिका येऊन पुन्हा आपल्या जागीं बसली. मल्लिकेचा वाचाळपणा पुन्हा सुरू झाला.

" वल्ली ! अग शर्थ झाली बाई तुझ्यापुढं ! कुठल्याशा संस्थानांत म्हणे भिकाऱ्यांचा कायदा केला आहे. धडधाकट भिकाऱ्यांना रिकामटेकडेपणानं भिक्षा मागूं द्यायची नाहीं, असा आहे तिथला कायदा. मग ते आळशी भिकारी आजारी असल्याचीं सोंगं करतात. कीं मग आलीच डॉक्टरतपासणी. पण त्या संस्थानांत तुला मोठ्या हुद्द्याच्या जागेवर नेमतील. मग कांहीं वनेशना फार त्रास करायला नको, आतांशा करतात तसा. आणि त्यांचं आपलं संशोधन कीं फंशोधन कसलं तेंही सुरळीत चालेल. जातेस का तिकड. म्हणजे, अशी रागावूं नकोस माझ्यावर. मी उगाच नाहीं तुला म्हणत. नुसत्या मुद्रेवरून तूं कुठला भिकारी खरा, कुठला खोटा हें ओळखतेस ना ? "

" मल्लिके ! माझी पारख जर खोटी झाली तर मग हवी तेवढी थट्टा कर. पण जरा अनुभव घेऊन तर पाहा. "

" म्हणूनच म्हणतें ग ! रुपया खरा कीं खोटा बघायचा झाला तर त्याला दगडावर आपटावा लागतो. पण खरा भिकारी नि खोटा भिकारी तूं तर नुसत्या नजरेनंच ओळखतेस. तुझी नजर माणसाचं मन ओळखते म्हणूनच वनेशना मुठींत ठेवलं आहेस बरं ! आमचं—हं स्वतःच्या स्थितींत…" आठवण ओघाओघानं येतांच असमाधानाचा सुस्कारा सोडून मल्लिका थांबली.

" मग काय सांगतेस का आपल्या पतिराजांना माझ्यासाठीं त्या संस्थानांत ती मोठ्याशा पगाराची जागा द्यायला ? पहिला पगार तुला बक्षीस ! "

थट्टेची बाजू अशी अचानक आंगावर आल्यामुळें मल्लिका गोंधळली. आपला अत्तराच्या सुवासानं घमघमणारा हातरुमाल बोटाभोवतीं गुंडाळीत ती म्हणाली,

" वल्ले ! तुम्ही स्वदेशीव्रताच्या बाण्याचीं माणसं ! नि लांच देण्याचे असले विचार थट्टेंत तरी तुझ्या मनांत कसे ग आले ? "

" असं कसं म्हणतेस मल्लिके, तुझ्या पतिराजांचा धंदा एजंटाचा. ते बरं कोणाचं काम करतील, मधल्या मध्यें कमिशन दाबल्याशिवाय ? कमिशन एजंट म्हणजे काय ! मौज ! चैन ! एका बाजूला व्यापारी माल घेऊन, दुसऱ्या बाजूला गिऱ्हाईक पैसा घेऊन ! कमिशन एजंट आपला खिसा

भरतोय आणि मग काय अशा हिरे माणकांच्या आंगठ्या आपल्या राणीच्या बोटांत चढवतोय!" ज्या आंगठीभोवतीं मल्लिका हातरुमालाचे फेरे घालीत होती, त्या बोटांतील आंगठी दाखविण्याची तिची इच्छा आहे, हें ओळखूनच वल्लिका मुद्दाम तिला खोचून म्हणाली.

त्या अचानक शरसंधानानें मल्लिका पुन्हा अडखळली. ती उलट हल्ला करणार तोंच तो भिकारी येऊन दाखल झाला देखील.

"बघ बघ मल्ले! बघ तर खरं, त्याच्या तोंडाकडे! तो निर्ढावलेला भिकारी दिसतो कीं रांगड्या राकट शेतकऱ्यासारखा दिसतो?" घरांत येऊन पोचणाऱ्या भिकाऱ्याकडे बोट दाखवीत वल्लिका म्हणाली.

"मला बाई त्यांत कांहीं समजत नाहीं. सगळयांचीं मेल्यांचीं तोंडं सारखींच. खापरतोंडे मेले! कशाला येतात दारांत त्रास द्यायला कुणाला ठाऊक! रविवारीं या ना मेल्यांनो सगळयांनीं जमून! धावधावतात आपले रोजरोज. काम नाहीं धंदा! सापडला आपला बिनभांडवली धंदा! उठले ते सुटले!"

मल्लिकेच्या तोंडचे हे शब्द ऐकून भिकाऱ्याच्या डोळयांत खळकन् पाणी आलें. वल्लिकेकडे रागाची एक नजर रोखून तो आल्या वाटेनें मागें फिरूं लागला.

वल्लिकेनें तें ओळखलें. त्या भिकाऱ्याच्या हातावर तिनें एक चवली दिली आणि तिनें त्याला बसावयास सांगितलें.

"हें बघ! बाबा! ह्या बाई बोलल्या तें तुला नव्हे बरं का? उठल्या सुटल्या धावणाऱ्या भिकाऱ्यांना त्या म्हणाल्या होत्या. तुला थोडी चपाती खायला आणतें ती खा, पाणी पी आणि मग जा."

वल्लिकेचें हें बोलणें आणि करणें मल्लिकेस मुळींच आवडलें नाहीं.

"मेला भिकारी तो भिकारी आणि आम्हांला रागावण्याची चोरी! काय तरी दिमाख! नाकाच्या शेंड्यावर एवढा राग तर भीक कशाला माग?" तणतणाट तोऱ्यांत मल्लिका बोलली. पण भिकाऱ्याच्या दुःखाची जखम ओघळून वाहूं लागली. त्याच्या डोळयांतून टपाटपा आसवें गळूं लागलीं. तो मानी होता. मल्लिकेस त्यानें केव्हांच चार सणसणीत उत्तरें ऐकविलीं असतीं. पण त्याच्या भावनेचा उद्रेक त्याला तसें करूं देईना. वल्लिकेच्या मायाळू औदार्यानें त्याच्या भावनेच्या तारा आंदोलित केल्या होत्या.

भिकारी आळीपाळीनें त्या दोघींकडे सारखा बघत होता. जणूं काय आपल्या मनांत त्या दोघींच्या अंतर्बाह्य स्वरूपास्वभावाची तो सांठवणी करून ठेवीत होता. एकीच्या आंगावर सोन्यामोत्यांचे दागिने तर दुसरीच्या आंगावर गळ्यांतील मंगळसूत्र आणि हातांतील काचेच्या बांगड्यांशिवाय कांहींच नाहीं. एकीचे उंची कपडे–जरीचें लुगडें आणि उंची कापडाचा मोहक ब्लाऊझ–तर दुसरीच्या आंगावर खादीचें पातळ आणि खादीचीच चोळी. एकीच्या हातरुमालावरील सेंटप्रमाणेंच स्वभावांत देखील उर्मट-पणाचा दर्प, तर दुसरीचा स्वभाव गंगाजलासारखा निर्मळ, सौम्य आणि शांत? दोन तरुणींच्यामध्यें किती हा फरक? मल्लिका आणि वल्लिका दोघींमध्यें इतका फरक? आणि तरी दोघींमध्यें इतकी दाट मैत्री! आश्चर्य!

मल्लिका भिकाऱ्याला तुच्छतेनें टाकून बोलली त्याचा त्याला आलेला राग आणि वाटलेलें दुःख वल्लिकेच्या मायेच्या एकाच शब्दानें नाहींसें करून टाकलें.

भिकारी त्या दोघींकडे नुसता टकमक पाहात होता. तेवढें त्यांचें पाहाणेंच तो खरा धंदेवाईक भिकारी नव्हे हें ठरवावयास पुरेसें होतें. तरी वल्लिका मल्लिकेस म्हणतच होती,

"अग, ते बघ त्याचे हाताचे दंड आणि डोईचें मुंडासें त्याचा शेतकरी बाणा उघड करून दाखवीत आहे. त्याचा आवाज देखील तसाच..."

"वल्लिके! तुला सांगूं का मी? कदाचित् हा घरफोड्या बेरड असावा. असले बेरड दिवसा भिक्षेच्या निमित्तानें फिरतात, घरादारांची टेहेळणी करतात नि मग रात्रीं दरोडे घालतात! बघतोय बघ ना कसा? नुसता बेरड! वल्लिका, इथं कांहीं तरी पाणी मुरतंय बरं का?"

"मल्लिके! पाणी मुरतंय खास, पण तूं म्हणतेस तसलं नव्हे. ही तुला वरची जी बेरडी कोरड दिसते आहे, तिच्या खालीं दुखाःचे वाहूं लागलेले हळवे ओघळ असले पाहिजेत, आपण विचारूनच पाहूं."

नंतर ती त्या भिकाऱ्याकडे वळून म्हणाली,

"काय रे, कुठला तूं?"

प्रश्नास उत्तर मिळालें नाहीं. भिकाऱ्यानें मान खालीं घातली.

"पाहिलंस वल्लिके!" मल्लिका थोडीशी विजयाच्या उत्साहानें म्हणाली.

" अग नाणं कच्चं असेल. मागायला भिक्षा पाहिजे चौपदरीची दीक्षा. ती दीक्षा यानं पुरी घेतली नसेल कदाचित् ?"

" हे पगा वैनीसाब, ताईसाब, असलं काय बी बोलूं नकोसा गरीबाला, मला भीक मांगायची सवय न्हाय. ह्या ममई शहरात आलो नोकरी पाह्याला. नोकरी कुठबी गिरणीत फिरणीत लागतवर पोट तर सुटत न्हाय ? तवा भीक मागाया निघालो. ती बी मागितली नसती, पर बायकापोरास्नी काय घालू ? तीं रस्त्यालगतच्या एका झाडाखाली फुटपायरीवर बसल्याती, नि मी निघालो भीक मागत." त्याचा घसा बोलतां बोलतां घोगरा झाला. त्यानें मान पुन्हा खालीं घातली आणि तो वल्लिकेकडे दीनवाणीनें पुन्हा टक लावून पाहूं लागला.

त्याचें तें पाहाणें मल्लिकेला कसेंसेंच वाटलें कारण त्या पाहाण्यांत दीनवाणेपणा होता. तसेंच वल्लिकेकडे पाहातांना त्याच्या नजरेंत आदरभाव दिसून येत होता. मल्लिका आपले दागिने आणि कपडे त्याला दिसतील असा थाटांत बसली असली, तरी तिच्याकडे तो पाहाण्याचें टाळी आणि पाहिलेंच तर तिरस्कारानें पाही. त्यामुळें त्याच्याविषयीं मल्लिकेला अधिकाधिक राग मनांतल्या मनांत येत होता. पण त्याची हकीगत ऐकावयास तीही कमी उत्सुक नव्हती.

" तूं भिकारी नव्हेस तर मग ?"

" न्हाइव "

" मग कां रे लागलास भीक मागायला ? फुकटचा धंदा म्हणून होय ?" रागारागानें मल्लिकेनें विचारलें.

" का ताइसाब उगाच रागावता गरिबावर ? मला काम द्याल तर आता मी येतो तुमच्याबरोबर. मला भीक कशी मागावी तेबी ठाव न्हाय. न्हाय तर कशाला तुमच्याकडून अस रागावून घेतल असत ? माज काय शेत नव्हत ? का मळा नव्हता ? सऽऽगळ होत–पन–पन " त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. तो मध्येंच अडखळला आणि पुनः मघांसारखाच मल्लिकेकडे बघूं लागला.

" मग काय झालं तुझं शेत रे ? कुणीं नेलं ?" असें त्याला मोठ्यानें

जोरांत विचारून वल्लिकेला हलक्या स्वरांत मल्लिका म्हणाली, "बघ हं कसा आतां गप्पा मारील तो. गप्पांची बनावट त्याच्या मनांत चालली आहे. जेव्हां जेव्हां खालीं मान घालतो त्या वेळीं तो जुळवाजुळव करीत असला पाहिजे ! आणि वल्ली ? हा तुझ्याकडे कां ग असा सारखा टक लावून पुन्हा पुन्हा बघत राहिला आहे ? जणूं कांहीं पूर्वीची आठवणच शोधून काढतोय्."

"कुणी न्हेल, कुणी न्हेल ? तुमी मस्करीत विचारीत असाल खर, पर माझ शेत एका राक्सान न्हेल–गिळल ! मी त्याच नाव बी घेयाचा न्हाय ?" भिकाऱ्याचा आवाज चढत चालला होता.

"बघितलंस वल्लिके ! कशी दिलीन ठोकून लोणकढी. त्याचं शेत म्हणे राक्षसान न्हेल. अजून काऊचिऊच्या गोष्टी सांगायला लागला नाहीं ! राक्षसाच्याच सांगतोय ! थोड्या वेळानं त्याला आम्ही परकऱ्या मुली दिसूं लागूं आणि मग तो काऊचिऊच्या गोष्टी देखील सांगूं लागेल. हं, बघ गंमत आतां." मग ती भिकाऱ्याकडे वळून म्हणाली, "आणि आऊत वाघाबिघानं खाल्ला असेल, होय ना रे ?"

"अव बायसाब, तुमी थट्टा करत्यासा, म्या वळिकलया. पण माज्या काळजाच जाळ तुमाला कस उमगत्याल जी ? त्याला शेतकऱ्याच्याच जल्माला जाव लागत ! अव माज आऊत, माज बैल वाघान खाल्ल असत तर त्येच्या मंदी चमत्कार कसला ? पर माज बैल माणसान खाल्ल, सावकारान खाल्लऽ वोऽग" तो मोठ्यानें ओरडून छाती बडवूं लागला ! मग त्यानें दोन्ही हात जमिनीवर आपटले ! डोळे वर आकाशाकडे केले. त्याची मुद्रा भेसूर दिसूं लागली.

"खून केला असता खून ! पर मला त्या देवान् बायकापोर दिली आन् असा लटकत ठेवालाया ! ही बायकापोर माज्या गळयात नसती, तर खून केला असता अन् तसा फासावर लटकलो असतो." हे शब्द बोलतांनाचा तो त्याचा आविर्भाव पाहून मल्लिका घाबरली. तिचा थट्टा करण्याचा विचार कुठच्या कुठें पळाला व आपण आतांपर्यंत बोललों तेंच खूप झालें असें तिला वाटलें. ती आपल्या जागेवरून उठून वल्लिकेच्या शेजारीं बसली. कारण ती थोडीशी त्या भिकाऱ्याला घाबरली होती. वल्लिकेविषयीं त्याच्या

मनांत आदर आहे हें तिनें पाहिलें होतें. आंगांत खून शिवशिवणारा माणूस! आलाच आंगावर तर काय घ्या ? अशा विचारानें ती जागेवरून उठली.

वल्लिका थोडीशी हसली! मल्लिकेची मनस्थिति तिनें ओळखली.

"नांव काय तुझं बाबा!" वल्लिकेनें भिकाऱ्याला विचारलें.

"माज नाव ? माज नाव दौलत्या! होत कशाच नांव ? जाळायच हाय! घर गेल दार गेल, तवाच नाव बी गेल."

"कोणतं गांव तुझं ?" वल्लिकेच्या शब्दांत दयार्द्रवता होती.

"फडगाव."

"फडगांव ? तें साताऱ्याकडचं कीं काय ?" तिनें विचारलें.

"व्हय व्हय, त्येच त्येच. फडगाव ठाव हाय का काय तुम्हास्नी बी ?" उत्सुकतेनें दौलत्यानें विचारलें.

"ऐकून ठाऊक आहे. पण तुझ्या गुरांढोरांचं काय झालं तूं म्हणालास तें ?"

"त्ये अस झाल–" दौलत्यानें आंवढा गिळला. "आमच दादासाब धनी होत त्ये लय चांगल होत. ते आजारी असताना आमच्या सोन्याचा त्योक वनिसराव तो व्हता कॉलेजांत इकडच्च कुटसा ममयला. दादासाब देवाघरी ग्येल. कशा पायी ध्येव जान, आन् त्यो राकस कसाब मांग काकासाब जान लइलइ दुवल! त्या कसाबान उठिवल काय तर म्हन दादासाबानी मृत्यूपत्र केलया अन् त्येच्यात म्हटलया कीं वनिस हा बायकुसंग ममयला ऱ्हावो, त्यो आपल्या बरोबर भांडतो त्येच आपल पटत ऱ्हाय तवा सारी इष्टक काकासाबानी घ्यावी अन् कारभार चालवावा. वनिस श्येना आज करता सवरता झाला तर त्याला मालकी द्यावी ऱ्हायतर काकासाबन् इष्टकीची वेवस्था आपल्या मनापरमान करावी...."

हकीगत ऐकतां ऐकतां वल्लिका त्याच्याकडे जास्त निरखून पाहूं लागली आणि मल्लिकेला अचंबा वाटूं लागून ती वल्लिकेच्या तोंडाकडे निरखून पाहूं लागली.

"हें खरें असो, पण तुझी कथा सांग ना काय ती ?" वल्लिकेनें त्याला म्हटलें.

"त्या कतेनच माझीबी कता हाय की!" दौलत्या म्हणाला, "वैनीसाब!" असें म्हणून तो पुन्हा वल्लिकेच्या तोंडाकडे टक लावून पाहूं लागला. तो

आपल्या जागेवरून उठला आणि वल्लिकेच्या जवळ जवळ जाऊं लागला. मल्लिका घाबरून थरथर कांपूं लागली. एकवार तिनें घरांत पळून जाण्याचा प्रयत्न करण्याचाही विचार केला. पण घरांत पळून जाण्यापेक्षां वल्लिकेच्या जवळ बसणेंच सुरक्षितपणाचें आहे असें तिच्या मनाला वाटलें होतें. पण आतां डाव उलटला. तो फार जवळ येतांच मल्लिकेच्या तोंडांतून किंकाळी बाहेर पडली !

"भिऊं नका, भिऊं नका, ताईसाब ! मी काय वेडा हाय व्हय ? आन वैनिसाब वैनिसाब, माझ्या बी तुमासारख्या व्हत्या वैनीसाब. मी तुम्हाला बघाया जवळ आलो त्यो वळिखण्यासाठी. आमच्या वैनिसाब वनिससाबासंग ह्या ममइतच खुटशा हाइत म्हणतात. ध्येव त्यास्नि बी सुखात ठेवो. माझबी औक्ष त्यास्नि देवो. वैनिसाबासारक्याच तुमिबी दिसताया म्हणून मी तुमास्निबी वैनिसाबच म्हणतोया पगा. नव्या धन्यान आम्हा कुळावर लई जुलूम केला. आमाला खर न्हाई वाटल काकासाब आमच धनी झाल अस. वनिस आमच धनी अस आमच मन सांगित व्हत. पर वनिस म्हन गांधीच्या चळवळीत पडल. तव्हा त्ये बी आम्हास्नि विचारीनात. अन् वनिस आमच धनी मी म्हटल म्हूनशान काकासाब माझ्यावर संतापल. चोपडीत बाकी काढून माज्या नावावर ठेवली. वकील त्यांच दोस्त हायत, माझ्यावर फियाद केली ! कागद खरा की खोटा ते कुट कोण बघलाया ? कागूद दिसला म्हंजी जाला पुरावा ! भाऊसाबांनीं माझ्यावर फैसला मिळविला आन् मला घरातून काढाया आल. मला ह्यातल काईबी ठाव न्हाय ! माज शेत काढून घेतल. माज बैल माजी गाय गोठ्यातून बाहेर काढली ! माजा लाल्या–माजा ढवळ्या ! आन् माझी टिक्कु ! ऊं ! ऊं !" तो लहान मुलासारखा रडूं लागला !

मल्लिकेनें वल्लिकेकडे पाहिलें.

"तुझ्याचकडची काय ही हकीकत ?" तिनें वल्लिकेला विचारलें.

"पण पुढं तर ऐकूं. दौलती, मग काय झालं पुढं ?" मल्लिकेनें विचारलें. आपली हकीकत ऐकून आपल्याविषयीं वाईट ग्रह करून घेणारीच आपणांला प्रश्न करते आहे असें पाहून दौलती आपली कर्मकथा पुढें सांगूं लागला.

"शेतकऱ्याला बगा वैनिसाब पोटातल्या पोरा परिस गोठ्यातल ढोरच अधिक असत. खरा हाडाचा शेतकरी आपल्या सवतीच्या गळयावर सुरी

ठेवायला देईल. पर गोठ्यातल्या गुराच्या दाव्याला कुनाला हात लावाया द्येयाचा न्हाय कदीबी ! या काकासायबान–कसला मेला कसाबच त्यो–माझ्या ढोरागुराचा लिलाव केला. लिलावदार माज्या गोठ्यांत शिरला व लाल्या ढवळयाच्या दाव्याला त्यान हात घातला आन् माजा हात कोयत्याकडे वळला, हात आवरला मी, पर माज्या डोक्यांत कसला सूळ उठला कुणाला ठाव व मी थतच पडलो. माज बैल माज्याकडे बघू लागल. ते दाव्यावरून हालनातच, लिलावदार तर त्यास्नि ओढू लागला. त्यांच्या गळयाला लागलेला दोर माज्यान बगवना. त्यांच्या पाठीवरुन म्या हात फिरवला. म्हटलं 'लाल्या जा, ढवळया जा ! तुझ्या नव्या धन्याच्या घरी जा हं, रडूं नका, जा ! आन मग दोनबी बैल माग बगत बगत चालू लागल. आन् वैनिसाब ! माझ्या डोळ्यात मिरग वरसला हो ऽऽ ओ ऽऽ" तो हेल काढून स्फुंदस्फुंदून रडूं लागला. वल्लिकेचे डोळे पाण्यानें थबथबले ! आणि मल्लिकेचाही पदर डोळ्यांकडे गेला.

"ताइसाब ! वैनिसाब ! काय सांगू ? आन कस सांगू ? सुबुद उठत न्हाइत तोंडात त्येला मी तरी काय करू ? हथे सगळ झाल अन् मग टिक्कूच्या दाव्याला हात घातला त्या वैऱ्यानी !" कुडत्याच्या बाहीनें त्यानें डोळे पुसण्याचा प्रयत्न केला पण खरोखरच त्याच्या डोळयांत 'मिरगच वरसला' होता.

"गाय मंजि शेतकऱ्याची माय बगा !" दौलती पुढें बोलूं लागला, "टिक्कूच्या दाव्याला हात घातल्याबरोबर टिक्कू त्याच्या अंगावर धावून गेली. शिपायानी मला दरडावला. गाईला सोडून हवाली करून दे अस मला त्यानी सांगितल वैनिसाब ! हरिश्चंदरान म्हण आपल राज, आपली प्रजा, इश्वामित्राला दान दिली आन् आपल्या वचनाला जागला. पोथी पुरानातली ती कता सांगताना हरदास पुराणिक हरिश्चंदर राजाला लई वाखानत्यात त्यो राजा व्हताच तसा. पर बगा ! वैनिसाब असल शंभर हरिश्चंदरराज एका शेतकऱ्याच्या काळजात असतात" असें म्हणून त्यानें दोन्ही हात आपल्या काळजावर मारले. जणूं काय तो आपलें हृदय उघडें करूनच त्या दोघीजणींना दाखवीत होता.

"शेतकरी, बगा वैनीसाब, शेतकरी कुडीतला प्राण देईल अन् गोठ्यातली

गाय ठेवील. पर मी कसला शेतकरी ? माजा प्राण न्हाय गेलाव. माज्या गोठ्यातली गाय कसाबान न्हेलेली म्या डोळयानी बघितली आन् अजून जिवत न्हायलो, माज्या टिक्कून हंबरडा फोडला ! माज्या काळजाच धाग ताट-ताट-ताट तुटल." त्याचे डोळे गरगर फिरूं लागले. मस्तकाच्या नाड्या ताड ताड उडूं लागल्या आणि तो धाय मोकलून रडूं लागला.

इतक्यांत एक माणूस आला. त्यानें वल्लिकेला निरोप आणला होता.

"वनेशराव प्रोफेसर रणदिव्यांबरोबर लॅबोरेटरींतच आहेत. शोध लागण्याची आशा दिसत आहे. हातचें काम ठेवून येतां येत नाहीं. आजही जेवणाची वाट बघूं नका." असा निरोप आहे आपल्याला वनेशरावांचा असें सांगून तो माणूस चटकन् निघूनही गेला.

"काय ? वनिसरावाचच घर होय हो ?" दौलती आश्चर्यानें म्हणाला. वल्लिकेनें नुसतें मानेनेंच होय म्हणून सुचविलें.

"आन् तुमिच माज्या वैनिसाब हायसा न्हय ? उगाच दुरून बगितल होत त्येला लय वर्स झाली खर पर तोंडवळा मला वळखिचा वाटत व्हता बघा ! तवाच मी फिराफिरून बगीत राह्यलो होतो. द्येव पावला तुमि मला गवासला. द्येव कल्याण करील तुमच. दादासाहेबाची सून तुमि. वनिसरावानाच वारसा मिळाया व्हवा. काकासाहेबान काय तरी खोटनाट बोटाळा करून इष्टक दडवलिया. सार जग म्हणताय अस, हे वनिसरावच तिकड बघित न्हाहीत. तवा त्येच आयतच फावल. पर काकासाहेब काय करतोय ठाव हाय ? ही असली पातक करूनशेनी ती पचाया व्होवीत म्हून सत्येनारायन करतोय, दानधरम करतोय, कुणाकुणाला बक्शिस बी द्येया लागलाय ! का ? तर लोकानी कुळानी आपनाला चांगला म्हंगाव म्हून. पर खर बिंग काय हाय त्ये कोणाला उमागलया ?"

इतक्यांत एक कुडबुडा जोशी तिथें आला. घर माडीचें नसून बैठें होतें. त्याच्या आसपास थोडीशी बखळ जागा होती. कुडबुडा जोशी आला तो एकसारखा ज्योतिष्याची भाषा बडबडूं लागला.

"देव तुमस भल भल करील ! कुडबुड् ! लक्शिमी घरांमंदि पानी भरील ! कुडबुड् ! दैनदाळिदर दूर सरल ! कुडबुड् ! मुलाबाळानी घर भरल ! कुडबुड् ! पर तुमास्नी एक वैरी हाय ! तो बळिवंत हाय ! कुडबुड् ! पण तुमची पुण्याइ लय ! कुडबुड ! तुमच्या वैऱ्याची नंगी मोडल ! कुडबुड !"

त्याच्या बडबडीकडे एका मल्लिकेशिवाय कुणाचें लक्ष नव्हतें, पण दौलतीचें मात्र त्याच्या डाव्या हाताकडे लक्ष लागून राहिलें होतें. कुडबुडा बोलत होता तें सारें भविष्य वल्लिकेला लागू पडत आहे असें मल्लिकेच्या मनानें घेतलें व ती त्याचें बडबडणें लक्षपूर्वक ऐकूं लागली.

"माझ भविष्य कद्दी खोट होत नाय. हे पागोट आणि हे–" दौलतीने इतक्याच सुमारास डोळे गरगर फिरवून दांत ओठ चावले आणि त्यानें कुड बुड्याच्या डाव्या हातावर हल्ला केला.

"सांग ! हे डाया हातातल लह्ह रुप्याच कड तुला कुठ मिळाल ?"

कुडबुड्या पहिल्या तडाक्याला तर घाबरलाच पण शेवटीं म्हणाला, "मी सातारच्या काकासाहेब सावकाराना ज्योतिष सांगितल, ते त्यांना पटल अन् त्यानी मला हे बक्षिस दिल."

"काय ज्योतिष त्यांना सांगितलंस तूं ? ऐकूं तरी !" मल्लिकेनें आतुरतेनें विचारलें.

"तुझा वैरी वाटतोय ! तो आपणच आपणच नाहींसा होईल अन् तुज कल्याण होईल."

"तुजा जीवच काढतो उपटून ! आसल जोतिष बोललास, आन् त्याचे साठी ह्ये कड तुला त्या मांगान दिल व्हय ? वैनिसाब ! हो माज कड. लिलावाच्या दिशी त्यान काढून घितलऽ ! आन् त्ये ह्येला दिलया ! का ? तर ह्यान आस्ल वंगाळ तोंडदेखल जोतिष सांगितल म्हून ! त्या मांगाला अस जोतिष सांगतोस आन हित येऊन ह्ये अस बडबडतोस व्हय ? माज कड ह्ये ! घ्येतोच आता काढून. काय ?"

दोघांची झटापट सुरू झाली. कुडबुड्यानें किंकाळी मारली. पोलीस धावून आले. काकासाहेबांचें नांव कानांत पडतांक्षणींच दौलतीचें मस्तक कडाडलें होतें. त्यानें गर्जना करून कुडबुड्यावर हल्ला केला !

दोघाचौघांनीं त्याला आवरून धरला. तरी त्यांना तो अनावर झाला होता, तो सारखा बडबडत होता. कुडबुड्याच्या कुडींत त्याला काकासाहेब दिसत होते कीं काय कोण जाणे ! पण कुडबुड्याकडे पाहून तो म्हणत होता, "काकासाब माज्या घरावरन नांगर फिरवलास होय ? खुट ठेवशील त्ये पाप ? मरून खवीस होईन पर तुज्या नरड्यावर येऊन बसन. कधीबी सोडायचा न्हाय !"